


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

जे ग्रंथी बोलिलें अद्वैत। तो म्हणों नये प्राकृत।
सत्य जाणावा वेदांत। अर्थ विषई।।
प्राकृतें वेदांत कळे। सकळ शास्त्रीं पाहातां मिळे।
आणी समाधान निवळे। अंतर्यामीं।।
तें प्राकृत म्हणों नये। जेथें ज्ञानाचे उपाये।
मूर्खासि हें कळे काये। मर्कटा नारिकेळ जैसें।।
आतां असो हें बोलणें। अधिकारपरत्वें घेणें।
शिंपीमधील मुक्त उणें। म्हणों नये।।

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

**भाषा आणि जीवन**

वर्ष १२ : अंक ४ : दिवाळी : १९९४



अनुक्रमणिका

### अनुक्रम



मुखपृष्ठावरील ओव्यांचा संदर्भ: दासबोध ७.१०.४६-४९

---

**प्रकाशन** : त्रैमासिक (जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर)

**संपादन-समिती** : कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द.दि. पुंडे, प्र.ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक** : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३५६०६१ / २४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा** : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४. (दूरध्वनी ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर** : आवरणपृष्ठ तीन पाहा.

**सूचना** : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

संपादक : कल्याण काळे / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा / मुद्रणस्थळ : संगम प्रेस प्रा.लि., कोथरूड, पुणे २९.

---

-संपादकीय

# ज्ञानक्षेत्रातले अराजक

गं. ना. जोगळेकर

चर्चासत्र, शिबिर, कार्यशाळा, परिसंवाद या गोष्टी आता नव्या नाहीत. महाविद्यालये, विद्यापीठे, साहित्यसंस्था, अन्य शैक्षणिक किंवा सार्वजनिक संस्था असे कार्यक्रम वेळोवेळी ठरवतात (म्हणजे 'आयोजित' करतात) आणि असे कार्यक्रम बऱ्या किंवा वाईट प्रकाराने पार पडतात (म्हणजे 'संपन्न' होतात). विद्यापीठ अनुदान मंडळ यांसारख्या शैक्षणिक संस्थांकडून अशा उपक्रमांना काही प्रमाणात अर्थसाहाय्य मिळू शकते. काही बँका, तसेच, रोटरी क्लबसारख्या काही संस्थाही मदतीचा हात पुढे करीत असतात. अर्थात हे अर्थसाहाय्य वेळेवर मिळतेच, असे नाही. कित्येकदा आर्थिक वर्षाच्या शेवटी शेवटी अशा रकमा खर्ची पडाव्या लागतात, म्हणून फेब्रुवारी-मार्चकडे चर्चासत्रांची एकदम गर्दी उसळते. (कुणी म्हणतात, पेव फुटते!) सुगी झाल्यावर गावोगावच्या जत्रा करीत फिरावे, त्याप्रमाणे अनेक विचारवंत गावोगावची चर्चासत्रे करीत फिरत राहतात. विषय अनेकदा तेच ते असतात; पण श्रोते वेगवेगळे असल्यामुळे तेच ते बोलत राहिले, तरी खपून जाते. उद्‌घाटन आणि समारोप यांसारख्या उपचारांवरही अनेकदा भरपूर वेळ द्यावा लागतो. बहुतेक वेळा नमनाला धडाभर तेल जाळले जाते आणि मुख्य ज्ञानपूजा मात्र 'उरकावी' लागते. पण चर्चासत्र म्हटल्यावर, बराच वेळ वाया जाणार, हे आता सर्वांनी गृहीतच धरलेले असते. ज्ञानाच्या क्षेत्रातली बेशिस्त ही लोकांच्या इतकी अंगवळणी पडली आहे, की 'हे असेच चालायचे', या निष्कर्षापर्यंत यावे लागते.

एकूण एक सगळी चर्चासत्रे निरर्थक ठरतात, असे समजणेही चुकीचे होईल. महत्त्वाचा विषय, भरपूर केलेली पूर्वतयारी, नेटके संयोजन, अधिकारी अभ्यासकांची उपस्थिती, ज्ञानप्रेमी श्रोत्यांचा प्रतिसाद, पुरेसे आधी तयार ठेवलेले चर्चासाहित्य, उपलब्ध वेळेचा सदुपयोग व्हावा, यासाठी जागरूक असलेले अध्यक्ष, काही तरी नवे आणि चांगले ऐकायला मिळाले, असे उपस्थितांना वाटणारे समाधान अशा फलश्रुतीची चर्चासत्रे घडतच नाहीत, असे नव्हे. पण ती इतकी अपवादात्मक असतात, की त्यांच्यामुळे नियम तेवढा सिद्ध होतो. अशा दुर्मीळ चर्चासत्रांच्या आठवणी नंतर

अनेकदा निघत राहतात.

मुळात चर्चासत्रे, परिसंवाद अशा उपक्रमांचे मोल इतके मोठे आहे, की त्यामुळे उपस्थित अभ्यासक खऱ्या अर्थाने 'बहुश्रुत' होऊ शकतात. अभ्यासू वृत्तीने तयार केलेला निबंध, त्याच्या सादरीकरणाचे कौशल्य, मुद्द्यांना धरून केलेली चर्चा, मार्मिक प्रश्न उपस्थित करून प्रस्तुत विषयाला नवी दिशा देणारे श्रोते असा सगळा योग जुळून आला, तर दोन-चार पुस्तकांच्या वाचनाने जे मिळणार नाही, ते एखाद्या चांगल्या चर्चेने नक्कीच पदरात पडते. पण प्रत्येक स्तरावरील अनास्था, बेफिकिरी आणि सौजन्यापोटी काहीही खपवून घेण्याची तयारी यांमुळे वेळ, पैसा, श्रम यांचा होणारा अपव्यय पाहून खऱ्या ज्ञानसाधकाला आपण अपराधी आहोत, असे वाटले पाहिजे. 'ह्या विषयाचा माझा अभ्यास नाही, म्हणून मी ही जबाबदारी स्वीकारणार नाही', असा ठाम नकारही द्यायचा नाही आणि स्वीकारलेले काम सचोटीने तडीस नेण्याची जिद्दही बाळगायची नाही, अशा आपल्या भोंगळ व्यवहारामुळे ज्ञानद्रोहाचा गुन्हा सर्रास घडत आहे. तीस-पस्तीस वर्षांपूर्वी 'पराधीन सरस्वती' हा परखड लेख लिहून डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी ज्ञानक्षेत्रात दिसणाऱ्या अपप्रवृत्तींचा समाचार घेतला होता. पण त्यांचा लेख हेही अरण्यरुदनच ठरले.

अशा चर्चासत्रांचे आयोजन कित्येकदा इतक्या घाईगर्दीने केले जाते, की संबंधित व्यक्तीला निबंध तयार करायला पुरेसा वेळही मिळत नाही. मग अशा वेळी संक्षिप्त टिपण किंवा ऐन वेळेचे व्याख्यान यांच्या रूपाने प्रसंग साजरा करावा लागतो. उत्स्फूर्त व्याख्यानांवर आधारलेली चर्चाही मग भरकटत जाते आणि शेवटी हाती काहीच लागत नाही. दिलेल्या विषयावर नेमके विवेचन करून, चर्चेला आधारभूत साधन पुरविणे हे अशा निबंधांचे उद्दिष्ट असते. पण या प्रारंभबिंदूच्या ठिकाणीच बेशिस्त सुरू होते. निबंधच तयार न करता नुसत्या व्याख्यानाने वेळ मारून नेण्याचा सोपा मार्ग स्वीकारल्यावर अपेक्षित अशा मुक्कामावर कुणीच पोचणार नाही, हे ओघानेच आले.

चर्चासत्रावर आधारित असे एखादे पुस्तक सिद्ध झाले, तर त्या चर्चासत्राने अखेरचा टप्पा गाठला, असे म्हणता येईल. हे काम सगळ्यांत किचकट आणि संबंधितांची कसोटी पाहणारे असते. निबंधकारांकडून त्या त्या निबंधाचे पुनर्लेखन करून घेणे, त्यावर आवश्यक ते संपादकीय संस्कार करणे, ठरलेल्या वेळेत पुस्तक प्रकाशित करणे यांतल्या प्रत्येक बाबतीत अनेक अडचणी येत असतात. असे वैचारिक ग्रंथ तत्परतेने प्रकाशित करणारे प्रकाशक मराठीत तरी अभावानेच आढळतात. या कामात दिरंगाई होत गेली, तर जे कोणी यात पुढाकार घेतात, त्यांना केव्हा यातून सुटका होते, असे होऊन जाते. त्यामुळे 'भरकटलेल्या चर्चासत्राचे ओढून काढलेले पुस्तक' एवढेच शेवटी हाती लागते. (अर्थात काही यशस्वी चर्चासत्रांवर आधारलेली नेटकी संपादने झाली आहेत, पण त्यांची संख्या फार थोडी आहे.) चर्चासत्राच्या

ठिकाणी येऊ न शकणारे जे बहुसंख्य अभ्यासक असतात, त्यांना पुस्तक-रूपाने चर्चासत्राचा अनुभव घेता यावा, अशी अपेक्षा असते; पण अशा अर्ध्याकच्च्या पुस्तकांमुळे कोणाचे समाधान होते, हा प्रश्नच आहे.

वाङ्मयीन, सामाजिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक विषयांवर देशभरात ठिकठिकाणी अनेक महत्त्वाची चर्चासत्रे घेतली जात असतात. अशा चर्चासत्रांत मराठी अभ्यासकांच्या मर्यादा उघड होतात. त्या त्या विषयाचे आकलन त्यांना झालेले नसते, असे नव्हे; पण इंग्रजी आणि हिन्दी भाषांतून सफाईने बोलायची सवय नसल्याने एरवी तावातावाने बोलणारे वक्ते एकदम मुके बनतात. चाळीस वर्षांपूर्वी अपुऱ्या इंग्रजी शिक्षणाचा प्रयोग ज्यांच्यावर झाला, त्यांना मराठी साहित्याची गोडी आहे; पण इंग्रजीबद्दल मनात भय आहे; आणि गेल्या दहा-पंधरा वर्षांतील इंग्रजी माध्यमातून घडलेल्यांना फाडफाड इंग्रजी बोलता येते, पण त्यांना मराठी किंवा भारतीय साहित्याशी काही देणेघेणे नाही. ही दु:स्थिती नाहीशी करायची असली; तर दुहेरी उपाययोजना करावी लागणार आहे, हे उघड आहे. खरे म्हणजे, चर्चासत्रांसंबंधी विविधांगी प्रशिक्षण देण्यासाठी एखाद्या संस्थेने पुढाकार घेण्याची गरज आहे. तरच कदाचित ज्ञानक्षेत्रातले अराजक थांबेल.

○○○





अनुक्रमणिका

# भाषेसंबंधी वेदातील काही विचार

वा. बा. भागवत

भाषा एक ज्ञानाचे साधन. त्या भाषेच्या माध्यमाने आपण विविध तऱ्हेचे ज्ञान मिळवतो. आपल्या आप्तेष्टांचे, सहकाऱ्यांचे अभिप्राय जाणून घेऊ शकतो. त्याचप्रमाणे त्याच माध्यमाने इतरांना ज्ञान देऊ शकतो. आपले मनोगतही जाणवू शकतो. अशा रीतीने भाषा आदान-प्रदान करणारे दुहेरी ज्ञानसाधन आहे.

प्रत्यक्ष आणि अनुमान ही सुद्धा सर्वमान्य दोन ज्ञानसाधने आहेत. पण ती दुहेरी नाहीत, एकेरीच आहेत. डोळस माणूस डोळयाने डोळयांचे विषय-रूप, आकार, इत्यादी केवळ स्वतः पाहू शकतो. दुसऱ्या व्यक्तीला त्या डोळयांचा काही उपयोग नाही. त्याने पाहिलेले रूप, आकार इतरांना तो भाषेच्या माध्यमानेच समजावू शकेल. त्याच्या डोळयांनी नाही. तीच स्थिती अनुमान ह्या ज्ञानसाधनाची. एकंदरीत ही दोन ज्ञानसाधने केवळ स्वार्थी, अप्पलपोटीच म्हणावी लागतील.

दुष्ट, स्वार्थी, मध्यम, संत असे माणसांचे चार प्रकार सुभाषितकार सांगतात. प्रत्यक्ष, अनुमान ही दोन दुसऱ्या स्वार्थी गटात, तर भाषा तिसऱ्या मध्यम गटात पडेल. प्रत्यक्ष ज्ञानसाधने डोळे, कान, नाक, त्वचा, जीभ निसर्गदत्तच असल्याने कोणी, केव्हा, कशी, हे प्रश्न त्याबाबत कोणीच करत नाही. ती सर्व ईश्वराच्या कृपेनेच प्राण्यांना मिळाली आहेत, असेच आस्तिक ठामपणे समजतात आणि त्या कृपाळू परमेश्वराबद्दल कृतज्ञता व्यक्त करतात. अनुमान हे पूर्वानुभवावर आधारलेले असल्याने प्राण्यांची स्वतःची कमाई म्हणता येईल. पशुपक्ष्यांची पूर्वानुभवाची स्मृती बरीच मर्यादित असते, त्यामुळे त्यांचे अनुमानही अगदी तोकडे असते. माणसांची वैयक्तिक स्मृती अनेक वर्षांची, तर सामाजिक स्मृती सहस्रावधी वर्षांची. त्यामुळे त्यांचे अनुमानही फार विस्तारलेले. पण ती सर्व त्यांचीच कमाई.

प्रत्यक्षापेक्षा अनुमानाचा विषय मोठा, तर अनुमानापेक्षाही भाषेचा पसारा शतपटीने मोठा. प्रत्यक्षाला वर्तमानकाळाची मर्यादा, तर अनुमानाला पूर्वानुभवाची, पूर्वानुभव वर्तमानापेक्षा विस्तृत असला, तरी माणसाच्या कल्पनासाम्राज्याच्या तुलनेत फारच तोकडा असतो. प्रत्यक्ष जसे वर्तमानकालाशीच संबद्ध, तसे अनुमान भूतकालाशी निगडित; पण भाषा तीनही कालांना व्यापून असते. माणसाचे कल्पनासाम्राज्य आणि

तीनही कालांना गवसणी ह्यांमुळे भाषा ह्या ज्ञानसाधनाला 'स्थिर चर व्यापुनि दशांगुले उरला।' असा अत्यंत व्यापकपणा प्राप्त झालेला आहे. एक श्रद्धावान भाषाभ्यासक म्हणतो,

**'अणिष्ठोऽपि दविष्ठोऽपि तथात्यन्तमसन्नपि।**

**प्रत्यक्ष इव येनार्थः तस्मै शब्दात्मने नमः॥**

अत्यंत सूक्ष्म, अतिशय दूरचा, इतकेच काय, सर्वस्वी कधीही अस्तित्वात नसलेल्या शशशृंग, वन्ध्यापुत्र, त्रिकोणी वर्तुळ अशा वस्तूंचे जणू काही प्रत्यक्ष दर्शन घडविणाऱ्या शब्दस्वरूपाला नमस्कार असो.

असं हे आगळंवेगळं ज्ञानसाधन कोणी घडवलं, केव्हा आणि कसं? अनुमानाप्रमाणेच ही माणसाचीच करामत असेल का? प्राचीन परंपरा म्हणते, 'छट्. भाषा ही कोणी माणसांनी निर्माण केली, हे म्हणणे म्हणजे शुद्ध वेडेपणा, पाखंडीपणा, नास्तिकपणाच होय. भाषा ही अमुक ठिकाणी, अमक्याने, अमुक वेळी प्रथम वापरली, असे म्हणण्यास ठोस पुरावा काहीच नाही. उलट, सूर्य, चंद्र, तारका, नद्या, समुद्र, इ. प्रमाणे ती कायमच आहे. चंद्रसूर्यादींप्रमाणेच ती दैवी कृपा आहे. अमुक काळी भाषा नव्हती, असे म्हणण्याला काहीच आधार नाही. भाषा ही गंगा नदीप्रमाणे कायम प्रवाही आहे. आम्ही आमच्या वाडवडिलांपासून, आमच्या वाडवडिलांनी त्यांच्या पूर्वजांपासून ती घेतली, अशा प्रकारे ती सदासर्वदा चालूच आहे.

सध्या उपलब्ध असलेल्या प्राचीन वाङ्मयात वेदवाङ्मय हे सर्वांत प्राचीन आहे. त्या वेदवाङ्मयातही ऋग्वेद प्राचीनतम आहे. ऋग्वेदाच्या अनेक सूक्तांत भाषेसंबंधी काही उल्लेख, तर काही ठिकाणी वर्णने आली आहेत. दहाव्या मंडलातील १२५ वे संपूर्ण सूक्तच अम्भृण ऋषीची मुलगी वाक् हिचे आहे. त्या सूक्तात आठ ऋचा असून, वाणी आपले सामर्थ्य सांगत आहे. अर्थात हे सर्व उल्लेख किंवा वर्णने आजच्या व्याकरणशास्त्र किंवा भाषाशास्त्राशी ताडून पाहणे हास्यास्पद ठरेल, हे खरे. तथापि, हजारो वर्षांपूर्वी ऋषींनी भाषेसंबंधी केलेले चिंतन, तसेच, आजच्या प्रगत भाषाशास्त्रीय विचारांचे अगदी अव्यक्त अस्पष्ट बीजपरमाणू काही प्रमाणात समजून येतील, हे निश्चित.

ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळातील १६४ व्या सूक्तात अनेक देवतांच्या स्तुतिपर अनेक ऋचा आहेत. त्यांतील ४५ वी ऋचा वाणीचे वर्णन करणारी आहे. 'वाणीची चार प्रकारची पदे असून, ती फक्त विद्वान ब्राह्मणांनाच समजतात. त्यांतील तीन गुहेत गुप्त ठेवलेली आहेत. चवथा भाग मनुष्य वापरत असतात.' असे वर्णन त्या ऋचेत आहे. ह्या ऋचेचे वेगवेगळे संकेत किंवा संप्रदायानुसार आठ अर्थ सायणाचार्यांनी दिलेले आहेत. ऋग्वेदाच्या अर्थासंबंधी विचार करणारा सर्वांत प्राचीन ग्रंथ निरुक्त (इसवी सनपूर्व सहावे शतक). त्यातही ह्या ऋचेच्या अर्थासंबंधी ऋषिमत, वैयाकरणमत, याज्ञिकमत, नैरुक्तमत, आत्मवादी मत, व्यावहारिक मत, अशी सहा मते दिलेली

आहेत. विभाजनाची म्हणजे नंतरच्या परिभाषेत व्याकरणाची सुरुवात ह्या ऋचेमध्ये मांडलेली प्रथमच आढळते. पण ते विभाजन कोणत्या स्वरूपाचे ? वाक्यातील शब्दांचे विभाजन की शब्दोच्चारण-प्रक्रियेचे विभाजन ? निरुक्तात, व्याकरण-महाभाष्यात आणि सायणभाष्यात वैयाकरणांचे मत मांडलेले आहे. त्याप्रमाणे नाम, आख्यात (क्रियापद) उपसर्ग, निपात (अव्यय) हे चार शब्दांचे प्रकार. सायणाचार्यांनी मातृक किंवा मांत्रिक मत दिले आहे, त्यानुसार परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी असे चार प्रकार. ह्या मातृक-मती प्रस्तुत ऋचेतील 'पद' शब्दाचा अर्थ स्थान असा घ्यावा लागेल. ह्या मताचा उल्लेख निरुक्तात नाही. शब्दाच्या उच्चारण-प्रक्रियेतील चार स्थानांनुसार हे चार प्रकार योगशास्त्रामध्ये, तसेच, तन्त्र वाङ्मयात सविस्तर मांडलेले आहेत. तथापि, ते बहुतांश सांकेतिक किंवा सांप्रदायिकच म्हणावे लागतील. शिवाय ते वैदिक वाङ्मयाच्या मानाने पुष्कळच अर्वाचीन आहेत. ऋग्वेद आणि निरुक्त ह्या दोहोंमध्ये अनेक वर्ष-शतकांचे अंतर असावे, तर ऋग्वेद आणि सायणभाष्य ह्यांमध्ये किमान अडीच ते तीन हजार वर्षांचे अंतर असावे. सायणभाष्यापेक्षा निरुक्त ऋग्वेदाला पुष्कळच जवळचे, म्हणून त्यात मांडलेली वैयाकरणांची शब्दविभागणीच ऋचा रचणाऱ्या ऋषीला अभिप्रेत असावी. शिवाय स्थानानुसार कल्पिलेली परा, पश्यन्ती वगैरे विभागणी अर्वाचीन म्हणूनही ती ऋचेत अभिप्रेत धरता येणार नाही, असे म्हणावे, तर ऋचेचा उत्तरार्ध सुसंगत ठरत नाही. तो उत्तरार्ध यौगिक किंवा तान्त्रिक मताशीच सुसंगत ठरतो.

व्याकरण महाभाष्याच्या (इसवी सन पूर्व दुसरे शतक) प्रारंभी व्याकरणाचे महत्त्व आणि वेदमूलकत्व सिद्ध करण्यासाठी काही वैदिक ऋचांचे व्याकरणानुकूल विवरण केलेले आहे. त्यात ही ऋचा दिलेली आहे. त्यात चार प्रकार म्हणजे नाम, आख्यात वगैरे दिले आहेत. पण त्यानुसार येणारी उत्तरार्धाशी विसंगती महाभाष्यकारांनी लक्षातच घेतलेली नाही. व्याकरणमहाभाष्याचा टीकाकार कैयट (अकरावे शतक) ही विसंगती दूर करण्याचा प्रयत्न करतो, तर सतराव्या शतकातील प्रसिद्ध वैयाकरण नागेशभट्ट वैयाकरणमत आणि यौगिकमत यांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न करीत आहे.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील एकाहत्तराव्या सूक्तात एकूण अकरा ऋचा आहेत. त्यांतील बऱ्याच ऋचा वाक्‌शी संबंधित आहेत. ह्या सूक्ताची परब्रह्म ही देवता प्राचीन परंपरेने मान्य केलेली आहे. वाणी आणि परब्रह्म यांचा आत्यंतिक निकटचा संबंध प्राचीन परंपरेने वाङ्मयनिर्मितीच्या प्रारंभकालापासून पक्का गृहीत धरलेला असावा. ह्या सूक्तातील पहिल्या ऋचेचे विवरण ऐतरेय ब्राह्मणात (१.३.६) केलेले आहे. त्यात बृहस्पतीने प्रारंभी एकाक्षरी, द्व्यक्षरी नामे वापरास प्रारंभ केला, तीच रूढ झाली, असे वर्णन आहे. ह्याच सूक्तातील दुसरी 'सक्तुमिव....' आणि चवथी 'उत त्वः पश्यन्..' ह्या दोन ऋचा महाभाष्यकारांनी व्याकरणाचा फायदा पटवून देण्यासाठी पहिल्या

आह्निकात उद्‌धृत केल्या आहेत. बोलताना चपखल शब्दांचा वापर, तसेच, वाच्य, लक्ष्य, व्यंङ्ग्य, तात्पर्य, इत्यादी अर्थांची उत्तम जाण ह्यांचे महत्त्व सांगणाऱ्या त्या आहेत. त्यामुळे व्याकरण शब्दाचा उत्तरकालीन रूढ अर्थ-शब्दांचे पृथक्करण आणि प्रकृति-प्रत्ययादी माध्यमाने शब्दसिद्धी-ह्याशी त्या ऋचांची सांगड फारच दुरून आणि फार ओढाताणीनेच घालावी लागेल.

आठव्या मंडलात शंभरावे भृगुगोत्री नेमऋषींचे सूक्त आहे. त्यात एकूण बारा ऋचा आहेत. पैकी दहा आणि अकरा ह्या दोन वाणीसंबंधी आहेत. त्यांच्यामध्ये वाणी अज्ञात अर्थांचा बोध करून देणारी असून, देवांनी निर्माण केली, असे तिचे दैवी स्वरूप स्पष्ट मांडलेले आहे.

आणखीही काही ऋचा व्याकरण महाभाष्यकारांनी व्याकरणाचे महत्त्व पटवून देण्यासाठी उद्‌धृत केल्या आहेत. पण व्याकरण ह्या प्राचीन शास्त्रामध्ये रूढ संकल्पनेशी त्यांचा संबंध फारच ओढाताणीने लावलेला दिसून येतो. खरे तर, त्यांचा भाषेशीही काही संबंध नाही आणि ही वस्तुस्थिती पारंपरिक श्रद्धा असणाऱ्या टीकाकारांनीही काहीशा दबलेल्या आवाजात व्यक्त केलेली आहे. वर उल्लेखिलेल्या 'चत्वारि वाक्......' ह्या ऋचेचा पूर्वार्ध भाषेतील शब्दांचे व्याकरणशास्त्रीय वर्गीकरण मांडत आहे, तर उत्तरार्ध शब्दोच्चारण प्रक्रियेचे चार टप्पे- सूक्ष्मतम, सूक्ष्मतर, सूक्ष्म, व्यक्त- सुचवीत आहे, म्हणून ही ऋचा भाषाशास्त्राभ्यासकांच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे, असे वाटते.

तैत्तिरीय संहितेमध्ये (६.४.७.३) एक कथा आहे. फार प्राचीन काळी देव अव्यक्त भाषा बोलत. देवांच्या मागणीमुळे इंद्राने अव्यक्त भाषेला व्याकृत म्हणजे व्यक्त केले. नंतर वापरात आलेल्या व्याकरण शब्दातील उपसर्ग (वि + आ) आणि धातू (कृ) यांचा प्रयोग येथे आढळतो. अव्याकृत आणि व्याकृत हे विशेषणशब्द पुढील काळी उपनिषदात, दर्शन वाङ्मयात आणि इतरत्र वापरलेले आढळतात. भाषेला व्यक्त करण्याचे साधन, म्हणजे व्याकरण, असा व्याकरण शब्दाचा प्राचीनकालीन अर्थ होईल.

ऐतरेय ब्राह्मणामध्ये 'होतृ' शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. गोपथ ब्राह्मणात (१.१.२४) 'ओम्' शब्दाच्या व्युत्पत्तीच्या संदर्भात 'को धातुः किं प्रातिपदिकम्....' इत्यादी प्रश्नांमध्ये व्याकरणातील अनेक पारिभाषिक शब्द वापरलेले आढळतात. तर मुंडकोपनिषदात १.१.५ शिक्षा, निरुक्त, व्याकरण यांचा अपरा विद्या म्हणून उल्लेख आहे. एकूण वैदिक वाङ्मयाचा कालखंड अनेक शतकवर्षांचा असावा. गोपथ ब्राह्मण आणि मुंडक वगैरे काही उपनिषदे यांचा काल ऋग्वेदकालाच्या मानाने पुष्कळच नंतरचा असावा, असे त्यातील विषय आणि भाषा इत्यादींवरून इतिहासाभ्यासक मानतात. तथापि, ऋग्वेदातील भाषाविभाजनाची मांडणी आणि गोपथ ब्राह्मणातील धातू, प्रातिपदिक, प्रत्यय, विभक्ती, इ. पारिभाषिक शब्दांच्या रोख, उल्लेख यांवरून वेदकालीन व्याकरणाची वाटचाल आणि भाषेसंबंधीचे विचार समजून येतील.





अनुक्रमणिका

(पाच डिसेंबर एकोणीसशे चौऱ्याण्णव रोजी महाराष्ट्र बँक पारितोषिक वितरण प्रसंगी केलेल्या अध्यक्षीय भाषणाचा पूर्वार्ध)

**भूषण, २/२, मनोज सहनिवास, मार्केट यार्ड रस्ता, पुणे ४११ ०३७.**

○○○

## सर्व भाषा, लिपी शिकविणारे 'भाषामंदिर'

जगभर विविध भाषा बोलल्या जातात. पाली, अर्धमागधी, ब्रह्मी, सुमात्री, फिनिशियन, प्राकृत आणि अशाच अविदित असलेल्या भाषा आणि लिपी कालौघात मागे पडल्या, नष्ट झाल्या. आज संस्कृत भाषाही अशीच मागे पडत असल्याचा अनुभव आहे. या भाषांबरोबरच अलीकडच्या सर्व भाषा आणि लिपी एकाच ठिकाणी शिकण्यासाठी लखनौमध्ये एक संस्था स्थापन करण्यात आली आहे. 'विश्व भाषा सेतू संस्थानम्' असे तिचे नाव आहे. भाषाप्रेमींच्या दृष्टीने ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे. यासाठी जरी काही काळ जावा लागणार असला, तरी त्यासाठी संस्थेने एक महत्त्वाकांक्षी प्रकल्प हाती घेतला आहे.

या संस्थेने यासाठी 'भाषामंदिर' उभारले आहे. या मंदिराच्या भिंतींवर प्राकृत, ब्राह्मी, सुमात्री, फिनिशियन, रोमन, तमीळ, संस्कृत, खरोष्ट्री, देवनागरी, युंडी, महाजनी आणि मौर्याच्या काळातील लिपीतील वचने कोरलेली आहेत. याशिवाय सध्या पन्नास भाषांतील वचने कोरण्याचे काम सुरू आहे. नजीकच्या काळात सुमारे तीनशे भाषांचा, त्यातील साहित्याचा, वचनांचा संग्रह करण्यात येत आहे, अशी माहिती संस्थेचे प्रमुख विनयकुमार अवस्थी यांनी दिली आहे.

श्री. अवस्थी यांचे वडील नंदकुमार अवस्थी यांचे हे स्वप्न होते. या क्षेत्रात नंदकुमार अवस्थी यांचे काम अतिशय स्तुत्य असेच आहे. यासाठी त्यांना १९७५ मध्ये 'पद्मश्री' ने सन्मानितही करण्यात आले आहे. विविध भाषांच्या उच्चारांवरून देवनागरी लिपीद्वारे त्या शिकता येतील का, असा श्री. अवस्थी यांचा प्रयत्न सुरू आहे. त्यांच्या या कामाची पाकिस्तान, इराण, ग्रीस, आखाती देशांतही वारंवार प्रशंसा करण्यात आली आहे. नेपाळी, अरेबिक, पर्शियन, अवेस्ता, हिब्रू, ग्रीक आणि भारतातील सोळा भाषांत त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत.

श्री. अवस्थी यासाठी १९६९ पासून सतत प्रयत्नशील आहेत. तीन दशकांहून अधिक काळ चाललेल्या या प्रयत्नांचे जणू प्रतीकात्मक मूर्त रूपच त्यांचे चिरंजीव विनयकुमार या मंदिराद्वारे उभे करीत आहेत. आजोबांनी लावलेल्या झाडाची फळे जसे नातू चाखतात, तसेच श्री. अवस्थी यांचे प्रयत्न यापुढील काळात भाषा शिकणाऱ्यांना उपयुक्त ठरतील नाही का?

(दै. सकाळ, पुणे दि. १७.३.९३ मधून)



अनुक्रमणिका

# संस्कृत आणि प्राकृत : भाषिक व सामाजिक संबंध

माधव देशपांडे

कै. कृ. पां. कुलकर्णी यांच्या जन्मशताब्दीनिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद आणि मराठी अभ्यास परिषद या दोन संस्थांनी मला आज इथे व्याख्यानाचे निमंत्रण दिले आणि मराठीशी माझे नाते पुन्हा जोडण्याची संधी उपलब्ध करून दिली, याबद्दल या दोन्ही संस्थांचे मी मनःपूर्वक आभार मानतो. जन्माने आणि बावीस वर्षांच्या संस्कारांनी मी जरी पुणेकरच असलो, तरी माझ्या आयुष्याची पुढची सव्वीस वर्षे माझे वास्तव्य अमेरिकेत झाले आहे. आमच्या अमेरिकेतल्या घरी मराठी भाषा मर्यादित संदर्भात वापरली जाते आणि 'मॉम्, आय् डोन्ट लाइक वांग्याचं भरीत, बट बटाट्याची यलो भाजी विथ् पोळी इझ् ओ. के.' अशा प्रकारची वाक्ये सर्रास ऐकू येतात. एकूण 'तिकडच्या कोपऱ्यात उभी हिंदमाता' यापेक्षा फार मोठे स्थान मराठीला आमच्या दैनंदिन व्यवहारात राहिलेले नाही. जी माझी आई जागेपणी इंग्रजी बोलत नाही, ती हल्ली हल्ली अमेरिकेत आमच्या स्वप्नात येऊन कधी कधी फर्डे इंग्रजी बोलते. अशा परिस्थितीत मराठी भाषा जमेल तितकी टिकवून ठेवण्याचा आम्ही अमेरिकावासी मंडळी आटोकाट प्रयत्न करीत असतो. पुण्याला मध्ये मध्ये येऊन मराठीत मिळेल तितके बोलून आमच्या मराठीला पुन्हा थोडी झिलई देणे हा त्या प्रयत्नांचाच एक भाग आहे. सव्वीस वर्षे महाराष्ट्राबाहेर असल्यामुळे माझ्या व्याख्यानात मराठीचे जे काही नकळत प्रमाद होतील, ते आपण खपवून घ्याल, अशी मला आशा आहे.

गेली काही वर्षे प्रा. अशोक केळकर हे मी मराठी आणि संस्कृत यांच्या संबंधांविषयी काही तरी लिहावे, असा मला आग्रह करीत आहेत. विशेषतः संस्कृत आणि मराठी यांचे संबंध मायलेकींसारखे होते, का सासवा-सुनांसारखे होते, याविषयी मी विचार करावा, असे त्यांनी सुचविले होते मराठीविषयी मी जरूर विचार करतो, परंतु महाराष्ट्र साहित्य परिषदेत जमलेल्या विद्वानांच्या समोर मराठीविषयी मी काही सांगायचे, म्हणजे मला रामायणातल्या एका प्रसंगाची आठवण होते. लक्ष्मण रामाला धर्म म्हणजे काय, याविषयी मोठे व्याख्यान झोडायला लागल्यावर रामाने त्याला सांगितले, 'न ते धर्मेऽधिकारोऽस्ति मा भूरात्मप्रशंसकः'. त्यामुळे आजचा विषय मी माझ्या अध्ययन-संशोधनाला जरा जवळचा 'संस्कृत आणि प्राकृत : भाषिक व सामाजिक संबंध' असा निवडला आहे. या विषयासंबंधी काही विचार आपल्यापुढे

मांडण्याचा माझा उद्देश आहे.

भाषाभाषांमधले संबंध हे अनेक प्रकारचे असतात. सर्वसाधारणपणे ऐतिहासिक भाषाशास्त्रामध्ये भाषांमधल्या जन्यजनकभावाचा विचार केला जातो. दोन भाषा या एकाच भाषाकुलातल्या आहेत, का भिन्न भाषाकुलातल्या आहेत? त्या जर एकाच भाषाकुलातल्या असतील, तर त्यांचे परस्पर नाते मायलेकींचे आहे, बहिणीबहिणींचे आहे, का मावस- बहिणींचे आहे? जर दोन भाषा एकाच भाषाकुलातल्या नसतील, तर त्यांचा एकमेकींशी दाट संपर्क झालेला दिसतो का? एकाच भाषाकुलातल्या नसूनही दोन भाषांमध्ये संपर्कामुळे देवाणघेवाण होऊ शकते. ही देवाण-घेवाण शब्दसंपत्ती, ध्वनी, वाक्यरचना इत्यादी अनेक बाबतींत होऊ शकते. भाषाभाषांमधले हे संबंध भाषिक संबंध आहेत, असे आपण म्हणू या. आज मी अशा शुद्ध भाषिक संबंधांपेक्षा वेगळ्या संबंधांचा विचार करणार आहे.

भाषा या त्यांचा वापर करणाऱ्या व्यक्तींच्या व्यवहारात जिवंत असतात. त्यांचे स्वतंत्र अस्तित्व दार्शनिकांनी कितीही मानले, तरी व्यवहारात नसलेल्या भाषांचा आपल्याला विचार करायचे काहीच कारण नाही. मानवी समाज भाषेचा जेव्हा उपयोग करतो, तेव्हा स्वतःच्या भाषेविषयी आणि त्याव्यतिरिक्त इतर भाषांविषयी त्या समाजाच्या काही विशिष्ट कल्पना असतात व भाषेचा व्यवहार या कल्पनांनुसार होत असतो. भाषेविषयीच्या या कल्पना विविध प्रकारच्या असतात. काही कल्पना भावनिक स्तरावरच्या असतात. 'मराठी असे आमुची मायबोली' अशी कविता म्हणताना मराठी माणसांचे मातृप्रेम उचंबळून येते. परंतु लग्नाचे मंत्र संस्कृतातच म्हटले गेले पाहिजेत, नाही तर ते लग्न विधिवत् लागले, असे आपल्याला वाटत नाही. म्हणजे भाषेबद्दलच्या काही कल्पना त्या भाषेच्या धार्मिक प्रतिष्ठेच्या असतात. पण 'मराठी असे आमुची मायबोली' असे म्हणणारे आणि वैदिक मंत्रांनी ज्यांची लग्ने लागली, असे पुण्यातले हजारो मध्यमवर्गीय आईबाप मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालतात, कारण आजच्या उद्योगधंद्याच्या जगात इंग्रजीला मराठी आणि संस्कृतापेक्षा फार वरचे स्थान आहे, ही वस्तुस्थिती आहे. म्हणजे व्यवसायाच्या स्तरावरची भाषेची प्रतिष्ठा ही धार्मिक प्रतिष्ठेपेक्षा वेगळीच आहे. भाषाभाषांमधले संबंध हे अशा अनेक प्रकारचे असतात. संस्कृत-प्राकृत संबंध हा मायलेकींसारखा आहे म्हणजे यांचा जन्यजनकभाव-संबंध आहे आणि परस्पर प्रेमाचा संबंध आहे, की या मायलेकी एकमेकींशी सासवा-सुनांप्रमाणे भांडणाऱ्या मायलेकी आहेत? प्रा. केळकरांनी सुचविलेल्या विषयाला असे अनेकविध फाटे फोडून आपल्याला या संबंधांचा विचार करायचा आहे.

१९७९ मध्ये प्रकाशित झालेल्या Sociolinguistic Attitudes in India: An Historical Reconstruction या पुस्तकामध्ये मी विविध आर्यभारतीय भाषांच्या विषयी जी विविध समाजांची भिन्न मते होती, त्यांचा ऐतिहासिक विकास विस्ताराने वर्णन केलेला आहे. या पुस्तकाला लिहिलेल्या पुरस्कारात प्रा. एम्. बी. एमेनो

(Emeneau, Foreword, Deshpande 1979a, p. 1) म्हणतात, 'अगदी प्राचीन काळी वैदिक आणि संस्कृत मातृभाषा बोलणाऱ्या आर्यभारतीय मंडळींच्या त्यांच्या आर्य आणि अनार्य शेजाऱ्यांच्या भाषांबद्दल काही विशिष्ट धारणा होत्या. त्यानंतर जेव्हा संस्कृत भाषा ही मातृभाषा न राहता उच्चवर्गाची शिष्टभाषा म्हणून राहिली, तेव्हा या सर्वोच्च मानल्या गेलेल्या शिष्ट भाषेच्या तुलनेने इतर स्थानिक भाषांचे स्थान काय ठरवायचे, हा मोठा प्रश्न होता. वैदिक परंपरेला विरोध करणाऱ्या जैन-बौद्ध-आजीविकांसारख्या नवोदित विद्रोही (protestant) परंपरांनी धार्मिक आणि सामाजिक कल्पनांप्रमाणेच संस्कृत भाषेच्या श्रेष्ठत्वाविरुद्ध भूमिका घेतल्याने हा प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा झाला.' प्राचीन भारताच्या भाषिक, सामाजिक व धार्मिक इतिहासात झालेली ही प्रचंड गुंतागुंत आजही या ना त्या प्रकारे अस्तित्वात आहे. या गुंतागुंतीत अडकलेले विविध धागे काय आहेत आणि ते एकमेकांत कसे गुंतलेले आहेत, हे समजून घेण्याचा आपण प्रयत्न करू शकतो. या विषयावर गेली वीस वर्षे मी सातत्याने लिखाण करीत आहे (देशपांडे १९७९अ, १९९३). आज मी आपल्यापुढे फक्त या चर्चेतले ठळक मुद्दे मांडणार आहे.

सिंधुसंस्कृती (ख्रिस्तपूर्व ३००० ते १७००) जरी प्राचीन भारतातली सर्वांत जुनी संस्कृती असली, तरी सिंधुसंस्कृतीची भाषा वाचण्यात अजून कुणाला म्हणावे असे यश आलेले नाही. त्यामुळे, भारतातले सर्वांत प्राचीन वाङ्मय म्हणजे वैदिक वाङ्मय असे आपल्याला म्हणावे लागते. अतिप्राचीन ऋग्वेदापासून ते उपनिषदांच्या काळापर्यंत या वाङ्मयाची कालमर्यादा साधारण ख्रिस्तपूर्व १५०० ते ५०० अशी आहे. आधुनिक इतिहासाच्या पुराव्यानुसार ऋग्वेदात संकलित केलेली सूक्ते म्हणजे प्रामुख्याने इराणातून भरतखंडाच्या पश्चिमोत्तर कोपऱ्यातल्या सप्तसिंधूंच्या प्रदेशात येऊन स्थायिक झालेल्या विविध आर्य जमातींच्या पुरोहितांनी त्यांच्या देवतांना उद्देशून लिहिलेल्या प्रार्थना व आवाहने आहेत. विशेषतः ऋग्वेदाच्या काळात या आर्य जमाती साधारण अफगणिस्तानापासून गंगा यमुनांच्या सुरुवातीपर्यंत पसरलेल्या होत्या. भरतखंडात प्रवेश करायच्या आधीपासूनच इराणातच या आर्य जमातींचा स्थानिक अनार्य समूहांशी संपर्क व संघर्ष सुरू झालेला होता. या अनार्यांना उद्देशून प्राचीन इराणात 'दहे' व 'दह्यु' हे शब्द वापरले जात होते, तर भारतातले आर्य 'दास' व 'दस्यु' हे शब्द वापरीत होते. आर्यांच्या दृष्टिकोनातून या काळात दोन प्रमुख 'वर्ण' होते, आर्यवर्ण आणि दासवर्ण. ऋग्वेदातील चित्रणाप्रमाणे आर्य आणि दास यांच्यामध्ये संघर्ष चालू होता, असे दिसते. तसेच, वेगवेगळ्या आर्य जमातींमध्येही संघर्ष चालू होते. आर्य जमाती एकमेकींशी संघर्ष करताना दासांशी सख्य करीत असत, असेही ऋग्वेदातल्या दाशराज्ञ युद्धाच्या वर्णनावरून दिसून येते. परंतु सांस्कृतिक व भाषिक स्तरावर आर्य आणि दास यांच्यामध्ये बरेच अंतर होते. ऋग्वेदीय आर्यांच्या दृष्टीने अनार्य दास - दस्यू हे 'अनिन्द्र' आणि 'अदेव' म्हणजे इन्द्राची पूजा न करणारे आणि देवांना न मानणारे होते. ते

'अयज्यु' म्हणजे यज्ञयाग न करणारे होते. त्यांचे वर्णन 'शिश्नदेव' आणि 'मूरदेव' असेही केले आहे. म्हणजे ते लिंगपूजक आणि मूर्तिपूजक होते. त्यांच्या भाषेला 'मृध्र' असे विशेषण 'मृध्रवाचः' या शब्दात लावलेले दिसते. याचा अर्थ बहुधा 'मूढवाचः' म्हणजे ज्यांची वाणी आर्यांना कळत नाही, ते लोक, असा असावा. म्हणजे अनार्य दास-दस्यू समाजाकडे पाहण्याचा आर्यांचा सर्वसामान्य दृष्टिकोन ऋग्वेदात काय होता, हे पाहता त्या अनार्यांची भाषा ही आर्य देवांची स्तुती व आवाहन करायला आर्यांना योग्य वाटेल अशी नव्हती, हे उघड आहे. आधीच्या प्रकरणांमध्ये चर्चा केल्याप्रमाणे ऋग्वेदीय आर्यांनी स्वतःच्या भाषेला 'देवी वाक्' असे म्हटले आहे, आणि या वाणीची महती अनेक प्रकारांनी गायिलेली आहे. सुरुवातीची देवी (म्हणजे दैवी) वाक् नंतर वाग्देवी कशी बनली, याचाही आधीच्या प्रकरणात मी सविस्तर विचार केला आहे. आर्यांची ही देवी वाक् त्यांच्या समजुतीप्रमाणे सफला आणि सपुष्पा होती, तर दासदस्यूंच्या वाणी अफला आणि अपुष्पा अशा होत्या. देवी वाक् आणि असुर्या वाक् असे निर्देशही वेदात सापडतात.

आर्य-अनार्य संपर्क/संघर्ष हा ऋग्वेदाच्या काळात अशा अवस्थेत होता, की अपवादात्मक सख्य सोडले, तर इंद्राला 'दस्युहत्ये' साठी आवाहन करणाऱ्या ऋचा आपल्याला ऋग्वेदाच्या त्या मानाने नवीन असलेल्या दहाव्या मंडलातही सापडतात. पण हळूहळू जसे आर्य भारताच्या पूर्वेकडे आणि दक्षिणेकडे पसरले, तसे आर्य-अनार्य समाजांचे, संस्कृतींचे व भाषांचे संमिश्रण मोठ्या प्रमाणावर होत गेले. या संमिश्रणाचा व संकराचा भाषिक परिणाम एम्. बी. एमेनो यांनी मांडलेल्या 'India as a Linguistic area' या कल्पनेच्या रूपाने दृश्य झाला. एमेनो यांनी अशी कल्पना मांडली आहे, की कित्येक शतकांच्या संपर्क व संकरानंतर आर्य, द्राविडी आणि मुंडा-संताळ कुलांमधील भाषांमध्ये ध्वनी, वाक्यरचना, शब्दसंपत्ती या सर्व स्तरांवर इतकी मोठ्या प्रमाणात देवाणघेवाण झाली, की विविध भाषाकुलांमधल्या या विभिन्न भाषांमध्ये भाषिक गुणधर्मांचा एक प्रकारचा समान ठेवा निर्माण झाला आहे. भाषांच्या बाबतीत जी देवाणघेवाण झाली, तशीच देवाणघेवाण इतर सर्व क्षेत्रांत झालेली आहे.

काही प्रमाणात या देवाणघेवाणीचा परिणाम म्हणून आणि काही प्रमाणात आर्यभारतीय भाषांमधील अंतर्गत प्रवृत्तींचा परिणाम म्हणून आर्यभारतीय भाषांमध्ये परिवर्तन होत गेले. ऋग्वेदाच्या काळी सुद्धा घरगुती वापरात प्राकृतसदृश भाषा अस्तित्वात होत्या, हे आता विद्वानांनी मान्य केले आहे (Elizarenkova, 1989). तसेच, आर्यभाषाकुलामध्ये अनेक प्रादेशिक व सामाजिक उपभाषाही प्रचलित होत्या. वापराच्या संदर्भामुळे यांतल्या काही उपभाषांना यज्ञीयभाषा, मंत्रभाषा, आणि शिष्टभाषा असे स्वरूप प्राप्त झाले, तर इतर उपभाषा व्यवहाराच्या इतर क्षेत्रांमध्ये प्राधान्याने वापरल्या गेल्या. 'संस्कृत' आणि 'प्राकृत' या शब्दांमुळे बऱ्याच वेळा विद्वानांची सुद्धा अशी समजूत होते, की भाषांमध्ये असे काही प्रचंड तट पडलेले होते.

वस्तुतः आपल्याला संस्कृत भाषेमध्ये कित्येक ठिकाणी प्राकृतसदृश गुणधर्म दिसतात, तर प्राकृत भाषांचेही संस्कृतीकरण झालेले दिसते. प्रत्यक्ष एखाद्या संदर्भातली भाषा ही संस्कृताचे प्राकृतीकरण आणि प्राकृताचे संस्कृतीकरण या दोन्ही प्रक्रियांचे फलरूप म्हणून तयार झालेली असते. परंतु ही झाली भाषाशास्त्रीय भूमिका. भाषा वापरणाऱ्या मंडळींच्या मात्र काही वेळा फार कडक समजुती असतात आणि त्या समजुतींची ताकद कधी कधी अशी असते, की त्यांची दखल घेणे भाग पडते.

वैदिक संहितांचा प्राचीन काळ संपून आपण जसे ब्राह्मण ग्रंथांच्या व उपनिषदांच्या काळाकडे येतो, तसे प्राचीन संस्कृत भाषेमधील काही अंश लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत, असे दिसते. 'इन्द्रशत्रु' या शब्दाचा वृत्राच्या पित्याला योग्य स्वरोच्चार करता येईना, या शतपथ ब्राह्मणातल्या कथेचा मी मागेच उल्लेख केला आहे. प्रयत्नांखेरीज नीट स्वरोच्चार करणे कठीण होऊ लागले आहे, याचा एक अर्थ असा, की दैनंदिन व्यवहाराची भाषा आणि धर्माचरणात वापरली जाणारी भाषा यांच्यांतले अंतर अशा प्रकारे वाढत आहे, की धर्माचरणात वापरली जाणारी भाषा खास प्रयत्न करून शिकावी लागते आणि खास प्रयत्नांनी तिचा योग्य वापर करता येतो. अशा काळात वेदांग वाङ्मयाची सुरुवात झालेली दिसते. सुमारे ख्रिस्तपूर्व ५०० या काळात निर्माण झालेल्या पाणिनीच्या व्याकरणात आणि यास्काच्या निरुक्तात ही उच्च स्तरावरची भाषा टिकवून ठेवण्याच्या प्रयत्नांचे दर्शन होते. ध्यानात घेण्याची गोष्ट ही, की पाणिनी या भाषेच्या उच्च स्तराला उद्देशून साधा 'भाषा' हा शब्द वापरतो. त्याने 'संस्कृत' हा शब्द वापरलेला नाही. भाषेचा उच्च स्तर जर साध्या 'भाषा' या शब्दाने दाखविला गेला असेल, तर या स्तराखालच्या भाषेच्या स्तरांना काय म्हणायचे ? त्याचे उत्तर स्वतः पाणिनीने दिलेले नाही, पण पतंजलीने या खालच्या स्तरांना उद्देशून 'अपशब्द', 'अपभ्रंश' आणि 'म्लेच्छशब्द' असे शब्द वापरले आहेत. म्हणजे दैनंदिन व्यवहाराची भाषा ही खालच्या दर्जाची आहे, तर धर्माचरणाला व विद्वत्तेला वापरायची भाषा ही 'भाषा' या साध्या शब्दाने दाखविलेल्या स्तरावर आहे. व्यवहाराची सामान्य पातळी ही प्राकृत भाषांची होती, असे आपल्याला वाटेल. पण संस्कृत वैयाकरणांनी ही पातळी संस्कृत भाषेला दिल्यामुळे सर्व प्राकृत भाषांचा व्यवहार हा या दृष्टिकोनातून सामान्य पातळीच्या खालच्या पातळीवर जाऊन पडलेला आहे. पाणिनी आणि कात्यायन हे 'अपभ्रंश' पातळी नुसती सूचित करतात, तर पतंजलीला 'भाषा' आणि 'अपभ्रंश/अपशब्द' ही परिभाषा परिचित आहे. पण या तिन्ही वैयाकरणांना 'संस्कृत' आणि 'प्राकृत' हे शब्द परिचित नाहीत. हे शब्द नंतरच्या काळात रूढ झालेले आहेत, आणि या शब्दांच्या द्वारा या भाषांकडे पाहण्याचा बदललेला दृष्टिकोन दिसून येतो. परंतु संस्कार केलेली भाषा ती संस्कृत; आणि निसर्गतः, प्रकृतिस्वभावाने वापरली जाणारी भाषा म्हणजे प्राकृत; असा जर 'संस्कृत' आणि 'प्राकृत' या शब्दांचा अर्थ आपण लावला, तर भाषांकडे पाहण्याचा एक वेगळाच दृष्टिकोन आपल्याला दिसून येतो. या दृष्टिकोनातून

प्राकृत भाषा या नैसर्गिक सामान्य स्तरावर आहेत, तर संस्कृत भाषा ही प्रयत्नपूर्वक संस्कार करून वरचा दर्जा प्राप्त करून दिलेली भाषा आहे, अशी कल्पना दिसते.

'संस्कृत' या शब्दाचा अर्थ कालिदासाच्या शब्दात म्हणजे 'संस्कारवती' भाषा असा आहे, यात मला शंका वाटत नाही, आणि 'प्राकृत' हा शब्द मुळात नैसर्गिक भाषा या अर्थाने वापरलेला आहे, असेही माझे स्वतःचे मत आहे. जैन ग्रंथांमध्ये 'पयडी' म्हणजे 'प्रकृती' हा शब्द 'मूळ स्वभाव, स्वरूप' या अर्थाने येतो. 'प्राकृत' या शब्दाला जर 'खालच्या दर्जाची भाषा' असा अर्थ मुळात असता, तर हा शब्द प्राकृत भाषा वापरणाऱ्या मंडळींनी स्वतःच्या भाषेला लावला नसता. परंतु 'प्राकृत' हा शब्द जैनांनी आणि 'पाली' हा शब्द बौद्धांनी त्यांच्या प्राकृत भाषांना लावलेला दिसतो. उदाहरणार्थ, 'अमिअं पाउअकव्वं (म्हणजे 'अमृतं प्राकृतकाव्यम्', वज्जालग्गम्, श्लोक २) असे म्हणणाऱ्या जैन जयवल्लभाला 'प्राकृत' या शब्दाचा 'खालच्या दर्जाची भाषा' असा अर्थ खचितच अभिप्रेत नव्हता. गउडवहो या प्राकृत काव्याचा कर्ता वाक्पतिराज याने (श्लोक ६५) संस्कृत भाषेचे प्राकृतीकरण आणि प्राकृताचे संस्कृतीकरण या दोन्ही प्रक्रियांमुळे काव्यात सौंदर्य निर्माण होते, असे म्हटले आहे, तर सर्वसामान्यपणे जैन लेखकांनी प्राकृतभाषेला सर्वोच्च आर्ष भाषेचे स्थान देऊन संस्कृतला कठोर, कठीण, व दुर्बोध अशी विशेषणे लावली आहेत.

**पाणिनी, कात्यायन व पतंजलीचा दृष्टिकोन**

'भाषे'चा (म्हणजे संस्कृतचा) स्तर (सामान्य पातळी)
'अपभ्रंशाचा' (म्हणजे प्राकृतचा) स्तर (खालची पातळी)

**'संस्कृत' व 'प्राकृत' या शब्दांनी दाखविलेला दृष्टिकोन**

'संस्कृत'चा स्तर (अतिसामान्य पातळी)
'प्राकृत'चा स्तर (सामान्य पातळी)

**वाक्पतिराजाचा दृष्टिकोन**

'संस्कृत'चा स्तर (अतिसामान्य पातळी)
'प्राकृत'चा स्तर (सामान्य पातळी)

**सर्वसामान्य जैन लेखकांचा दृष्टिकोन**

'प्राकृत'चा स्तर (आर्ष, अतिसामान्य पातळी)
'संस्कृत'चा स्तर (कठोर, कठीण, दुर्बोध पातळी)

पुराणांमध्ये दिलेल्या हकीकतीनुसार, पाणिनी हा महापद्म नंद या राजाला समकालीन होता. जशी परशुरामाने पृथ्वी नि:क्षत्रीय केली, तसे या महापद्माचे वर्णन पुराणांनी केले आहे. सर्व क्षत्रियांचा नाश करून, हा शूद्र माणूस राजा झाला व इथपासून पुढे शूद्र राजे होतील, असे भाकीत पुराणांनी केले आहे. या वर्णनामधून ब्राह्मणवर्गाला या राजांविषय निर्माण झालेली चिंता, त्यांचे क्षत्रियेतर स्थानिक समाजामधून झालेले उन्नयन, आणि त्यांच्या ब्राह्मणी धर्मविरोधी प्रवृत्ती या गोष्टींची आपल्याला सूचना मिळते. सामान्यपणे हा काळ जैन आणि बौद्ध परंपरांच्या उदयाचा व विकासाचा आहे. तसेच, या अवैदिक परंपरांना पाठिंबा देणाऱ्या मौर्य सत्तेचा उदयही यानंतरच आला. जैन, बौद्ध, आजीविक परंपरांनी धार्मिक-दार्शनिक क्षेत्रात जसा ब्राह्मणी तत्त्वज्ञानाला विरोध केला, तसेच, त्यांनी सामाजिक क्षेत्रात जसा ब्राह्मणांच्या वर्चस्वाला आणि भाषिक क्षेत्रात संस्कृत भाषेच्या वर्चस्वालाही विरोध केला. या नवोदित विद्रोही धार्मिक परंपरांना पाठिंबा देणाऱ्या मौर्य राजांनीही प्राकृत भाषांचा पाठपुरावा केला, असे दिसते. सम्राट अशोकाचे काही पश्चिमोत्तर प्रदेशातले ग्रीक आणि ॲरमेइक भाषांमधले शिलालेख सोडता बाकी सर्व शिलालेख प्राकृत भाषांमध्ये आहेत. त्याचा एकही शिलालेख संस्कृतात नाही. अशोकाच्या आधीच्या काळात म्हणजे एकदम सिंधुसंस्कृतीतल्या शिक्क्यांपर्यंत आपल्याला लिखित भाषेच्या पुराव्यासाठी जावे लागते, आणि अजून त्या लिपीचे रहस्योद्घाटन झालेले नसल्यामुळे या संस्कृतीची भाषा नक्की कोणती, ते कळत नाही. त्यामुळे अशोकाच्या आधी संस्कृतचे राजव्यवहारात प्राबल्य होते, आणि मौर्यकाळात या क्षेत्रात संस्कृतला बाजूला सारून प्राकृतला ते स्थान दिले गेले, असे आपण छातीठोकपणे सांगू शकत नाही. परंतु मौर्यकाळात प्राकृतला राजाश्रय होता आणि संस्कृतला नव्हता, एवढे तरी आपण निश्चित म्हणू शकतो. 'देवानं पियो' ('देवानां प्रियः') हे शब्द स्वतःला उद्देशून अशोकाने मोठ्या अभिमानाने त्याच्या शिलालेखांमध्ये वापरले आहेत. परंतु अशोकाने व त्याच्या वंशजांनी अवैदिक धार्मिक पंथांना आणि प्राकृत भाषांना दिलेल्या पाठिंब्यामुळे चवताळलेल्या ब्राह्मणवर्गाने 'देवानां प्रियः' या शब्दाचा अर्थच 'मूर्ख' असा ठरवून टाकला ('षष्ठ्या आक्रोशे' पा. ६.३.२१ या सूत्रावरचे 'देवानांप्रिय इति च' हे वार्त्तिक). यावरून या काळातल्या धार्मिक आणि भाषिक स्पर्धेची तीव्रता दिसून येते.

संस्कृत आणि प्राकृत भाषांमधील संबंधाचा विचार करताना हे ध्यानात घेतले पाहिजे, की संस्कृत वैयाकरणांचा दृष्टिकोन हा एवढा एकच दृष्टिकोन अस्तित्वात नव्हता, तर या दृष्टिकोनाहून फार वेगळे असे अनेक इतर दृष्टिकोन अस्तित्वात होते. काव्यादर्शामध्ये दंडी सांगतो, की 'अपभ्रंश' या शब्दाने काव्याच्या क्षेत्रात आभीर वगैरे समाजांच्या भाषेचा निर्देश होतो, तर व्याकरणादी शास्त्रांमध्ये संस्कृत सोडून इतर साऱ्याच भाषांना 'अपभ्रंश' म्हटले जाते ('आभीरादिगिरः काव्येष्वपभ्रंश इति स्मृताः। शास्त्रेषु संस्कृतादन्यदपभ्रंशतयोदितम् ॥', काव्यादर्श १.३६). ब्राह्मणी शास्त्रांच्या

परंपरांची प्राकृत भाषांविषयीची मते अधिक कडकडीत सोवळी आहेत, तर काव्याच्या क्षेत्रातली मते ही अधिक उदार आहेत. शास्त्रांचा संबंध हा धर्मजनकतेशी आहे, व त्या दृष्टीने त्यांना संस्कृतेतर सर्व भाषा तुच्छ वाटतात. पण काव्याचा संबंध रसाचा परिपोष होण्याशी आहे. समाजाचे भावनिक जीवन हे संस्कृतापेक्षा देखील प्राकृत-अपभ्रंश आणि इतर स्थानिक भाषांशी अधिक निगडित आहे आणि त्यामुळे रसपरिपोष प्राकृत-अपभ्रंशादी भाषांच्या द्वारा उत्तमरीत्या होतो, हे वास्तव काव्यशास्त्राने कधीच नाकारलेले नाही.

भाषांच्या सामाजिक प्रतिष्ठेच्या बाबतीतही आपल्याला फार विचार करण्याची गरज आहे. प्राकृतभाषांना ब्राह्मण शास्त्रकारांनी दिलेले कमी प्रतिष्ठेचे स्थान प्राकृतभाषी समाजांनी स्वतः मान्य केले होते का? याच प्रश्नाची सामाजिक प्रतिष्ठेची बाजू आपल्याला वेगळया प्रकारे मांडता येईल. ब्राह्मण शास्त्रकारांनी स्वतःला दिलेले सर्वोच्च महत्त्वाचे स्थान आणि क्षत्रियांना दिलेले दुय्यम दर्जाचे स्थान क्षत्रियांनी स्वतः मान्य केले होते का? माझ्या मते संस्कृत धर्मशास्त्रांमध्ये दिसणाऱ्या कल्पना या सर्व भारतीय समाजाबद्दलच्या असतील, पण त्या सर्व भारतीय समाजाच्या कल्पना नव्हत्या. त्या प्रामुख्याने ब्राह्मणी समाजाच्या कल्पना होत्या. संस्कृत वाङ्मय हे बहुतांशी ब्राह्मण लेखकांचे वाङ्मय असल्यामुळे क्षत्रियांचा प्रत्यक्ष दृष्टिकोन काय होता, हे या वाङ्मयावरून बहुधा समजत नाही. तरी सुद्धा ब्राह्मणी वाङ्मयात देखील क्षत्रियांच्या काही वेगळया कल्पना असल्याच्या खाणाखुणा अगदीच नाहीत, असे नाही. उदाहरणार्थ, राजसूय यज्ञाच्या संदर्भात शतपथब्राह्मण (१४.६.२.२३) सांगते, आधी फक्त ब्रह्मच होते. ते एकटेच असल्याने त्याचा काही प्रभाव पडेना. म्हणून त्या ब्रह्माने उत्तम प्रकारचे इंद्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यू, आणि ईशान हे क्षत्रिय देव निर्माण केले. त्या क्षत्रसामर्थ्यापलीकडे दुसरे काही नाही. म्हणून ब्राह्मण राजसूय यज्ञात क्षत्रियापेक्षा खालच्या आसनावर बसतो. ब्रह्मातूनच क्षत्राचा जन्म झाला आहे, ('ब्रह्म वा इदमग्र आसीत्। तदेकं सन्न व्यभवत्। तच्छ्रेयोरूपमत्यसृजत क्षत्रं यान्येतानि देवत्रा क्षत्राणीन्द्रो वरुण; सोमो रुद्रः पर्जन्यो यमो मृत्युरीशान इति। तस्मात् क्षत्रात्परं नास्ति। तस्माद्‌ब्राह्मणः क्षत्रियमधस्तादुपास्ते राजसूये क्षत्र एव तद्यशो दधाति सैषा क्षत्रस्य योनिर्यद्ब्रह्म।'). या उताऱ्यामध्ये दोन कल्पनांचे मिश्रण झालेले स्पष्ट दिसते. यातले वास्तव निरीक्षण हे आहे, की ब्राह्मण पुरोहित हा राजसूय यज्ञात राजाच्या आसनापेक्षा खालच्या पातळीवर बसतो. हीच गोष्ट राजसभेत होत असावी. परंतु उरलेली चर्चा ब्राह्मण पुरोहिताच्या मनाचे दर्शन घडविते. ब्राह्मण पुरोहित मनातल्या मनात म्हणतो, की ब्रह्मापासून क्षत्र निर्माण झाले. साध्या भाषेत सांगायचे, तर पुरोहित म्हणतो, की मी माझ्या मंत्रसामर्थ्याने या व्यक्तीला राजा केले. परंतु राजसूयातले ब्राह्मणाचे राजाच्या खालचे आसन क्षत्रियांच्या सामाजिक प्रतिष्ठेच्या कल्पना दाखविते. राजाचे स्थान ब्राह्मणाच्या वरचे आहे.

जर आपल्याला संस्कृत साहित्यात ब्राह्मणी कल्पनांचे प्राधान्य दिसले, तर जुन्या बौद्ध आणि जैन ग्रंथांमध्ये आपल्याला क्षत्रियांचा दृष्टिकोन अधिक स्पष्टपणे दिसतो. सर्व उपलब्ध पुराव्यांवरून असे दिसते, की अनुयायांना धर्मोपदेश करीत असताना बुद्धाने स्वतःची प्राकृत भाषा वापरली. जनसामान्यांपर्यंत आपले तत्त्वज्ञान पोहोचावे, हा यात हेतू होता. बुद्धाचे तत्त्वज्ञान फक्त उच्चवर्णीयांसाठी नव्हते, तर ते 'बहुजनहिताय बहुजनसुखाय' होते, असे बौद्ध ग्रंथांनी म्हटले आहे. बुद्धाने त्याच्या शिष्यांनाही अनुयायांच्या स्थानिक भाषा ('सकाय निरुत्तिया') वापरून धर्मोपदेश करण्याची आज्ञा केली होती. परंतु याचा अर्थ असा करता येणार नाही, की बहुजनसमाजापर्यंत धर्मज्ञान पोहोचविण्यासाठी बुद्धाने स्वतःची उच्चवर्णीय भाषा सोडून खालच्या दर्जाची भाषा वापरली. अशा प्रकारच्या कल्पनेला प्राचीन बौद्ध वाङ्मयात मुळीच आधार नाही.

बुद्धाने त्याच्या मार्गाला, धर्माला व त्याच्या अनुयायांना उद्देशून सगळीकडे (पाली) 'अरिय' म्हणजे 'आर्य' हे विशेषण लावले आहे. 'अरिय धम्म' ('आर्य धर्म'), 'अरिय मग्ग' ('आर्य मार्ग') यांसारखे अनेक शब्द बौद्ध ग्रंथांत विखुरलेले आहेत. 'आर्य' या विशेषणाचा '(सांस्कृतिक, नैतिक, सामाजिक, इत्यादी दृष्टींनी) उत्कृष्ट' असा सामान्य अर्थ जरी लावला, तरी 'आर्य' शब्दाचा या ग्रंथांमधला वापर फार महत्त्वाचा आहे. आर्यत्वाच्या ब्राह्मणी धर्मशास्त्रातल्या कल्पनेला प्रतिस्पर्धी अशी आर्यत्वाची एक नवी कल्पना तयार करण्याचा बुद्धाचा प्रयत्न आहे. ब्राह्मणी धर्मशास्त्रातले ब्राह्मणांचे सर्वोच्च स्थानही बुद्धाने स्पष्टपणे नाकारले आहे. धर्माच्या संदर्भात त्याने जातिसंस्था पूर्णपणे नाकारली, पण त्याने सामाजिक प्रतिष्ठेच्या संदर्भात मात्र क्षत्रियांना सर्वोच्च स्थान दिले आहे. क्षत्रिय जर ब्राह्मणांपेक्षा श्रेष्ठ असतील, तर या क्षत्रियांची प्राकृत भाषा ब्राह्मणी संस्कृतपेक्षा वरचढ असली पाहिजे.

ब्राह्मण आणि क्षत्रिय एकमेकांशी कसे वागत होते, याचे उत्कृष्ट चित्रण पाली त्रिपिटकात दिसून येते. दीघनिकायाच्या प्रसिद्ध महापरिनिब्बानसुत्तामध्ये मगधाचा राजा अजातशत्रू, वर्षकार या त्याच्या ब्राह्मण मंत्र्याला बोलावून त्याला एकेरी शब्दात सांगतो, 'अरे ब्राह्मणा, इकडे ये. जिथे भगवान् (बुद्ध) आहे, तिकडे जा. माझ्या सांगण्यावरून भगवंतांच्या पायांवर डोके ठेवून त्यांना वंदन कर' ('एहि त्वं ब्राह्मण येन भगवा तेनुपसंकम। उपसंकमित्वा मम वचनेन भगवतो पादे सिरसा वन्दाहि।', महापरिनिब्बानसुत्त, दीघनिकाय, महावग्गो, नालंदा प्रत, पृ. ५८). इथे ब्राह्मण मंत्र्याला उद्देशून राजाने 'त्वं', 'एहि', 'उपसंकम' यांसारखी द्वितीयपुरुषी एकवचनाची रूपे वापरली आहेत. परंतु हाच ब्राह्मण बुद्धासमोर जाऊन त्याला 'भगवान्' असे संबोधन न वापरता 'भो गोतम' असे संबोधन वापरतो व स्वतःला उद्देशून (पाली) 'मयं' (संस्कृत 'वयम्') असे प्रथमपुरुषाचे बहुवचनी रूप वापरतो (तत्रैव, पृ. ६१). पण ब्राह्मणाशी बोलताना बुद्ध पुन्हा राजाप्रमाणेच 'त्वं ब्राह्मण' असे शब्द वापरतो (तत्रैव, पृ. ६१). म्हणजे एकूण क्षत्रियांची ब्राह्मणाकडे पाहण्याची पद्धत आणि ब्राह्मणाच्या स्वतःबद्दलच्या

कल्पना यांमध्ये फार मोठे अंतर आहे. दीघनिकायाच्या अंबट्ठसुत्तामध्ये बुद्ध आणि एक अंबट्ठ नावाचा ब्राह्मण यांच्यांतला जातिसंस्थेविषयीचा संवाद आला आहे. या संवादात बुद्ध असे सिद्ध करण्याचा प्रयत्न करतो, की सामाजिक स्तरावर आणि जातीच्या शुद्धतेच्या संदर्भात क्षत्रिय हे ब्राह्मणांपेक्षा वरचढ आहेत. ज्या मुलाचे आईबाप ब्राह्मण-क्षत्रिय असे संमिश्र आहेत, अशा मुलाला क्षत्रिय कधीच क्षत्रिय म्हणून मान्य करणार नाहीत, पण त्याला ब्राह्मण मात्र वेद शिकवतील, असे बुद्धाने म्हटले आहे. या संभाषणाच्या शेवटी बुद्धाने अगदी स्पष्ट, म्हटले आहे, की क्षत्रिय कितीही हीन झाला, तरी सुद्धा ब्राह्मणापेक्षा क्षत्रियच श्रेष्ठ आहे', 'इति खो अम्बट्ठ यदा खत्तियो परमनिहीनत्तं पत्तो होति तदा पि खत्तिया व सेट्ठा, हीना ब्राह्मणा। खत्तियो सेट्ठो जने तस्मिं ये गोत्तपटिसारिनो ति।', दीघनिकाय, नालंदा प्रत, खंड १, पृ. ८६. वर्णांची यादी सांगताना सुद्धा पाली ग्रंथांमध्ये ही यादी 'ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र' या क्रमाने येत नाही, तर नेहमी 'क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र' या क्रमाने येते (दीघनिकाय, नालंदा प्रत, खंड १, पृ. ८०, १६०, २०४). पाली ग्रंथांमध्ये हा क्षत्रिय सामाजिक श्रेष्ठतेचा दृष्टिकोण अनेक ठिकाणी दिसून येतो.

हाच दृष्टिकोण आपण भाषेच्या बाबतीतही लागू केला पाहिजे. बुद्धाच्या दृष्टीने क्षत्रियांनी वापरलेली प्राकृत भाषा ही ब्राह्मणी संस्कृत भाषेपेक्षा श्रेष्ठ असली पाहिजे. बौद्ध ग्रंथांमध्ये अशी हकीकत अनेक ठिकाणी सांगितली आहे, की बुद्धाचे ब्राह्मण अनुयायी अब्राह्मण भिक्षूंच्या प्राकृत भाषांकडे पाहून त्यांच्यांतल्या भाषिक अशुद्धतेने उद्विग्न होत असत. अशा उद्विग्न झालेल्या ब्राह्मण भिक्षूंनी कित्येक प्रसंगी बुद्धाला त्याच्या उपदेशाचे संस्कृतात रूपांतर करण्याची परवानगी मागितली व प्रत्येक वेळेस बुद्धाने ती परवानगी न देता या भिक्षूंना स्थानिक भाषांमध्ये ('सकाय निरुत्तिया') उपदेश करण्याचा आदेश दिला (Franklin Edgerton, 1953, Vol. I, pp. 1-2).

पुढच्या काळात बौद्ध परंपरांमध्ये जशी दार्शनिक स्थित्यंतरे घडून आली, तशीच काही महत्त्वाची भाषिक व सामाजिक स्थित्यंतरे घडून आली. या पुढच्या काळातले बहुतेक उपलब्ध हीनयान व महायान ग्रंथ मिश्र किंवा शुद्ध संस्कृतात आहेत. तसेच, वसुबंधु, नागार्जुन, असंग, धर्मकीर्ती, दिङ्नाग, इत्यादी महत्त्वाचे सर्व बौद्ध आचार्य हे मुळातले ब्राह्मण आहेत. या ब्राह्मण बौद्ध आचार्यांनी कळत नकळत बौद्ध पंरपरेचे काही अंशी ब्राह्मणीकरण आणि ग्रंथांचे संस्कृतीकरण केले आहे. आधीची बौद्ध पंरपरा अधिक प्रमाणात क्षत्रिय दृष्टिकोण दाखविते, असे जर आपण म्हटले, तर ही नवी बौद्ध ब्राह्मणी परंपरा ब्राह्मण समाजाला आणि संस्कृत भाषेला बौद्ध संदर्भातच महत्त्वाचे स्थान मिळवून देते.

याचे एक उदाहरण म्हणून मी ललितविस्तर या लोकोत्तरवादी बौद्ध परंपरेमधल्या बुद्धाच्या दिव्यतेने भरलेल्या चरित्रातले काही विचार आपल्यापुढे मांडणार आहे. या

ग्रंथानुसार बोधिसत्त्व केवळ ब्राह्मण व क्षत्रिय घराण्यांत जन्म घेतात. ते चाण्डाल, वेणुकार, रथकार, पुष्कस वगैरे समाजांत कधीच जन्म घेत नाहीत. जेव्हा जगामध्ये ब्राह्मणांचे वर्चस्व असते, तेव्हा बोधिसत्त्व ब्राह्मण कुलात जन्म घेतात; आणि जेव्हा क्षत्रियांचे वर्चस्व असते, तेव्हा ते क्षत्रिय कुलात जन्म घेतात ('न बोधिसत्त्वा हीनकुलेषूपपद्यन्ते चण्डालकुलेषु वा वेणुकारकुलेषु वा वेणुकारकुले वा रथकार कुले वा पुष्कसकुले वा। अथ तर्हि कुलद्वये एवोपपद्यन्ते ब्राह्मणकुले क्षत्रियकुले च। तत्र यदा ब्राह्मणगुरुको लोको भवति, तदा ब्राह्मणकुले उपपद्यन्ते। यदा क्षत्रियगुरुको भवति तदा क्षत्रियकुले उपपद्यन्ते। एतर्हि भिक्षवः क्षत्रियगुरुको लोकः। तस्माद्बोधिसत्त्वाः क्षत्रियकुले उपपद्यन्ते।' ललितविस्तर पृ. १४). या उताऱ्यामध्ये ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचा क्रम हा लक्षणीय आहे. इथे ब्राह्मणांचा उल्लेख क्षत्रियांच्या आधी आला आहे व जगात कधी कधी ब्राह्मणांचे वर्चस्व असते, हे मान्य केले आहे. बोधिसत्त्व जन्माला येण्याच्या आधी तुषित नावाच्या स्वर्गात चाललेली चर्चा या ग्रंथात आली आहे. उग्रतेजस् नावाचा ब्राह्मणशरीर धारण केलेला देवपुत्र म्हणतो- ब्राह्मणांच्या मंत्र-वेदशास्त्रांमध्ये उत्तम व्यक्तींच्या जन्माचा जो प्रकार सांगितला आहे, त्याच प्रकाराने बोधिसत्त्वाने आईच्या उदरात प्रवेश करावा, 'तत्रोग्रतेजा नाम ब्रह्मकायिको देवपुत्रः .... एवमाह - यथा ब्राह्मणानां मन्त्रवेदशास्त्रपाठेष्वागच्छति तादृशेनैव रूपेण बोधिसत्त्वो मातुः कुक्षावक्रामितव्यः।', ललितविस्तर, पृ. २९. यापुढे जाऊन या बौद्ध ग्रंथाने अशी कल्पना मांडली आहे, की बौद्धांच्या शुद्धावासकायिक देवांनी जम्बुद्वीपात येऊन ब्राह्मणरूप धारण करून ब्राह्मणांना वेद शिकविले, 'अथ शुद्धावासकायिका देवपुत्रा जम्बुद्वीपमागत्य दिव्यं वर्णमन्तर्धाप्य ब्राह्मणवेशेन ब्राह्मणानध्यापयन्ति स्म।', ललितविस्तर, पृ. ११. म्हणजे या ना त्या मार्गाने ब्राह्मणांचा व त्यांच्या वेदशास्त्राचा बौद्ध परंपरांमध्ये चंचुप्रवेश झाला आहे व या चंचुप्रवेशापासून सुरुवात होऊन ब्राह्मणांचे बौद्ध परंपरेत महत्त्वाचे स्थान निर्माण झाले आहे. बौद्ध ग्रंथांचे संस्कृतीकरण होण्यात या बौद्ध ब्राह्मणांचा महत्त्वाचा हातभार आहे. ललितविस्तरातल्या वर्णनाप्रमाणे बुद्ध जी बाराखडी शिकतो, ती देखील संस्कृत आहे, प्राकृत नाही.

जैन परंपरेतल्या भाषिक-सामाजिक विचारांचा विचार करताना बौद्ध परंपेरशी काही अंशी साम्य दिसते, पण महत्त्वाचे फरकही दिसतात. बुद्धाप्रमाणेच महावीरही भारताच्या ईशान्य प्रदेशातल्या क्षत्रिय कुळात जन्मला होता. क्षत्रिय परंपरेचा आणि स्थानिक अर्धमागधी भाषेचा अभिमान हा प्राचीन जैन वाङ्मयात आपल्याला पदोपदी दिसून येतो. जैन परंपरेत 'आर्य' कोणाला म्हणावे, याबद्दल महत्त्वाची चर्चा आढळून येते. अनेक जैन ग्रंथांमध्ये अशी चर्चा आहे. इथे मी इसवी सनापूर्वी सुमारे पहिल्या शतकात तयार झालेल्या पण्णवणासुत्त या एका जैन ग्रंथातल्या चर्चेचे (पृ. ३५- ३७) विश्लेषण करणार आहे.

पण्णवणासुत्ताने परिचित मानवी समाजांचे प्रथम 'अरिय' ('आर्य') आणि

'मिलक्खू' ('म्लेच्छ') असे वर्गीकरण केले आहे. या अनार्य किंवा म्लेच्छ समाजांची भली मोठी यादीच या ग्रंथात दिली आहे. हे सर्व प्राकृत शब्द आहेत- सग, जवण चिलाय, बब्बर, काय, मुरुण्ड, उड्ड, भदग, निण्णग, पक्कणिय, कुलक्ख, गोण्ड, सिंहल पारस, गोन्धोडम्ब, दमिल, चिल्लल, पुलिन्द, मेय, पल्हव, मालव, गग्गर, आभासिय, णक्क, चीन, ल्हसिय, खस, खासिय, नेड्डुर, मंढ, डोम्बिलग, लउस, बऊस, केक्कय, अरवाग, हूण, रोमग, भरुग, रुय, गन्धाहारग, अज्ञल, पास, कलय, आणि मूयलि. हे जर सगळे म्लेच्छ, तर आर्य कोण? आर्यांचे दोन प्रकार या सुत्ताने सांगितले आहेत. पहिले आर्य म्हणजे 'ऋद्धिप्राप्त' आर्य होत. या ऋद्धिप्राप्त किंवा वरच्या दर्जाच्या आर्यांमध्ये अरहन्त, चक्कवट्टि ('चक्रवर्ती'), बलदेव, वासुदेव, चारण, आणि विज्ञाहर ('विद्याधर'), यांचा अंतर्भाव केलेला आहे. यांत वरिष्ठ क्षत्रियांचा समावेश आहे, पण ब्राह्मण, वैश्य व शूद्र या वर्गापैकी कोणी नाही. सामान्य आर्य, किंवा 'अनृद्धिप्राप्त आर्य, हे नऊ प्रकारचे असतात.

**क्षेत्रार्य :** राहण्याच्या प्रदेशामुळे आर्यत्व मिळालेले लोक

**जात्यार्य :** जन्माने आर्यत्व मिळालेले लोक

**कुलार्य :** कुलामुळे आर्यत्व मिळालेले लोक

**कर्मार्य :** कर्मामुळे आर्यत्व मिळालेले लोक

**शिल्पार्य :** व्यवसायामुळे आर्यत्व मिळालेले लोक

**भाषार्य :** भाषेमुळे आर्यत्व मिळालेले लोक.

**ज्ञानार्यः** ज्ञानामुळे आर्यत्व मिळालेले लोक

**दर्शनार्यः** दर्शनामुळे आर्यत्व मिळालेले लोक

**चरित्रार्यः** नैतिक आचरणामुळे आर्यत्व मिळालेले लोक

एकीकडे तर जैनांनी असे म्हटलेले दिसते, की म्लेच्छांच्या यादीत असलेले लोक अनार्य आहेत. परंतु या नऊ प्रकारांनी आर्यत्व प्राप्त होते, असे सांगून त्यांनी आर्यत्वाच्या वाटा मोकळया करून दिलेल्या आहेत, असे दिसते. अशा अनेक प्रकारांनी ज्यांना आर्यत्व प्राप्त झाले, ते सगळे आर्य आहेत, असे म्हणायची त्यांची तयारी आहे. म्हणजे ज्यांना ब्राह्मणी परंपरा अनार्य समजत होती, असे अनेक लोक जैन आणि बौद्ध परंपरांद्वारा स्वतःला आर्यत्व प्राप्त करून घेत होते. यातून आर्यत्वाच्या संदर्भातला ब्राह्मणी परंपरा आणि जैन परंपरा यांमधला फरक स्पष्ट होतो. या अवैदिक धर्मांना एकदम एवढ्या मोठ्या प्रमाणावर अनुयायी कसे मिळाले, याचेही एक चांगले स्पष्टीकरण यातून मिळते.

ज्या प्रदेशांवरून आर्यत्व मिळू शकत असे, असे प्रदेश जैनांच्या दृष्टीने कोणते होते? पण्णवणासुत्ताची यादी पाहा : मगध, अंग, वंग, कलिंग, कासी, कोसल, कुरु, कुसट्ठ, पंचाल, जंगल, सुरट्ट, विदेह, कोसंबी, संडिल्ल, मलय, वच्छ, अच्छ, दसण्ण,

चेदी, सिंधुसोवीर, सूरसेण, भंगी, वट्ट, कुणाल, लाढा आणि केयइअड्ढ. या प्रदेशांची तुलना पतंजलीच्या आर्यावर्ताशी आणि धर्मशास्त्रातल्यां कल्पनांशी केली पाहिजे. पतंजलीच्या आर्यावर्तात फक्त हिमालय आणि विन्ध्य यांच्यामधला आणि सरस्वती लुप्त होण्याच्या प्रदेशापासून प्रयागापर्यंतचा भाग आलेला होता. जैनांचे बरेचसे आर्य प्रदेश याबाहेरचे आहेत. बौधायनधर्मसूत्र (१.१.३२-३३) सांगते, की आनर्त, अंग, मगध, सुराष्ट्र, दक्षिण, उपवृत्, सिंधु आणि सौवीर या प्रदेशांतले रहिवासी जन्माने शुद्ध नाहीत, तर संकरज आहेत. आरट्ट, कारस्कर, पुण्ड्र, सौवीर, वंग, कलिंग आणि प्रनून या अपवित्र प्रदेशांमध्ये जाऊन आल्यावर शुद्धी होण्यासाठी सर्वपृष्ठी ही इष्टी करावी. जैनांचे बरेच आर्य प्रदेश बौधायनाला अपवित्र वाटणारे होते.

**ब्राह्मणी आणि जैन आर्य प्रदेशांची तुलना**




जे लोक जातीने आर्य आहेत, त्यांच्या जाती अम्बट्ठ, कलिन्द, विदेह, वेदग, हरिय आणि चुंचण अशा पण्णवणासुत्ताने सांगितल्या आहेत. यांतल्या अम्बट्ठाविषयी मनुस्मृती (१०.८) सांगते, की वैश्य स्त्रीला ब्राह्मण पुरुषापासून झालेली ही मिश्र संतती आहे, आणि विदेहाबद्दल मनुस्मृती (१०.१०) सांगते, की ब्राह्मण स्त्रीला वैश्य पुरुषापासून झालेली ही मिश्र संतती आहे. कुळाने आर्य असलेल्यांची कुळे पण्णवणासुत्ताने अशी दिली आहेत : उग्ग, भोग, राइण्ण, इक्खाग, णात आणि कोरव्व. महावीर हा णात घराण्यातला होता, तर बुद्ध हा इक्खाक (संस्कृत 'इक्ष्वाकु', पाली 'ओक्काक') कुळातला होता. परंतु उग्र हा शूद्र स्त्रीला क्षत्रिय पुरुषापासून झालेला भीतिप्रद पुत्र होय, असे मनुस्मृती (१०.९) म्हणते.

पण्णवणासुत्ताने आर्य व्यवसायांची बरीच मोठी यादी दिलेली आहे. यांतले किती व्यवसाय ब्राह्मणी धर्मशास्त्राला आर्य व्यवसाय म्हणून मान्य होतील, हा प्रश्नच आहे.

दोस्सिय (दौष्यिक)

सोत्तिय (सौत्रिक)





अनुक्रमणिका

कप्पासिय (कार्पासिक)
सुत्तवेयालिय (सुक्तवैतालिक)
भण्डवेयालिक (भाण्डवैतालिक?)
कोललिय (कौलालिक)
णरवाहणिय (नरवाहनिक)
तुण्णाग (?)
तन्तुवाय
पट्टगार (पटकार, पट्टकार?)
देयड (दृतिकार)
वरण (?)
छव्विय (छर्विक)
कट्ठपाउयार (काष्ठपादुकाकार)
मुंजपाउयार (मुञ्जपादुकाकार)
छत्ताग (छत्रकार)
वज्झार (वह्यकार)
पोत्थार (पुस्तककार)
लेप्पार (लेप्यकार)
चित्तार (चित्रकार)
संखार (शंखकार)
दन्तार (दन्तकार)
भण्डार (भाण्डकार)
जिज्झकार (?)
सेल्लगार (शैलकार)
कोडिगार (कोटिकार?)

धर्मसूत्रांमधील वर्णनाकडे पाहता यांतले बहुतेक सर्व व्यवसाय हे वैश्य आणि शूद्र यांच्या व्यवसायांत मोडतील. या यादीत नाही कोण, तेहीं पाहण्यासारखे आहे. या यादीत ब्राह्मणाच्या व्यवसायाचा आर्य व्यवसाय म्हणून अंतर्भाव नाही. तसेच शेतकऱ्याचाही या यादीत उल्लेख नाही. अर्थात या सगळयाचा आज आपल्याला पूर्णपणे अर्थ लावता येत नाही. कदाचित ज्या व्यवसायातील मंडळी कमी-अधिक प्रमाणात जैन धर्माची अनुयायी बनली, त्याचा निर्देश या यादीने केला असावा.

आता भाषेने आर्य कोण? पण्णवणासुत्त सांगते, की जे अर्धमागधी भाषा वापरतात आणि ब्राह्मी लिपी वापरतात, ते भाषेने आर्य होत.

खरोष्ठी लिपीचा प्रदेश यातून वगळला गेलेला आहे. तसेच, याच अर्धमागधीसारख्या प्राकृतांना संस्कृत वैयाकरण 'अपभ्रंश' या शब्दाने हिणवीत होते, हे विसरून चालणार नाही. दुसरी गोष्ट म्हणजे, आर्य भाषा बोलण्याने एक प्रकारचे आर्यत्व येते, असा जैनांचा अभिप्राय दिसतो. मनुस्मृतीने (१०.४५) मात्र आर्यभाषा बोलणे आणि आर्य असणे यांत स्पष्ट फरक केला आहे. चार वर्णांच्या बाहेरचे जे लोक आहेत-, मग ते आर्य भाषा बोलोत, नाही तर म्लेच्छ भाषा बोलोत ते सगळे दस्यूच मानले जातात ('मुखबाहूरुपज्ज्ञानां या लोके जातयो बहिः। म्लेच्छवाचश्चार्यवाचस्ते सर्वे दस्यवः स्मृताः।'). एकूण जैन आणि ब्राह्मणी शास्त्रांचा 'आर्य' कल्पनांची तुलना करताना दिसणारे चित्र खाली दिलेले आहे.

**ब्राह्मणी धर्मशास्त्रांची आर्यत्वकल्पना**

| | |
|---|---|
| ब्राह्मणी शास्त्रांना संमत असलेले आर्य समाज | म्लेच्छ समाज |
| काही प्रमाणात आर्यांचे अनुकरण करणारे, पण धर्मशास्त्राने आर्य न मानलेले समाज | |

**जैनांची आर्यत्वकल्पना**

| | |
|---|---|
| प्रदेश, जाती, कुल, कर्म, व्यवसाय, भाषा, ज्ञान, दर्शन, आचार, इत्यादींमुळे आर्यत्व प्राप्त झालेले व स्वतःला आर्य म्हणविणारे समाज | म्लेच्छ समाज |





अनुक्रमणिका

**दोन आर्यत्वकल्पनांचा संकलित परिणाम**

| | |
|---|---|
| ब्राह्मणी शास्त्रांना संमत असलेले आर्य समाज | म्लेच्छ समाज |
| स्वतःला आर्य समजणारे, पण ब्राह्मणी परंपरेने आर्य म्हणून स्वीकार न केलेले जैन-बौद्धादी समाज | |

या सगळया पार्श्वभूमीवर जैन लेखकांच्या भाषेच्या प्रतिष्ठेविषयीच्या कल्पना आपल्याला स्पष्ट होतात. समवायांगसुत्तात म्हटले आहे, की महावीर हा अर्धमागधी भाषा वापरून त्याचा धर्मोपदेश करीत असताना चमत्कार घडून या अर्धमागधीचे ऐकणाऱ्या आर्य, अनार्य, पशु, पक्षी, सर्प, इत्यादी सर्वांच्या भाषेत आपोआप परिवर्तन होत असे, 'भगवं च णं अद्धमागहाए भासाए धम्ममाचिक्खइ। सा वि य णं अद्धमागही भासा भासिज्जमाणी तेसिं सव्वेसिं आरियमणारियाणं दुप्पयचउप्पयमियपसुपक्खिसरीसिवाणं अप्पपणो हियसुहदायभासत्ताए परिणमइ।', समवायांगसुत्त, आगमोद्धारसमिती प्रत, पृ. ६०. यातून अनेक कल्पना दिसून येतात. अर्धमागधी ही सर्वाधिक प्रतिष्ठेची भाषा होती व तिच्यात परिवर्तन होऊन इतर सर्व भाषा निर्माण झाल्या. जरी अर्धमागधी ही आदिभाषा होती, तरी सुद्धा जैनांनी हे मान्य केले होते, की प्रत्येक व्यक्तीला धर्मोपदेश त्याच्या त्याच्या वैयक्तिक भाषेतच ऐकू गेला पाहिजे, कारण प्रत्येक व्यक्तीची स्वतःची भाषा ही त्या व्यक्तीला 'हितसुखदायक' असते. अर्धमागधी ही महावीर आणि राजा कूणिय म्हणजे अजातशत्रू यांच्या संभाषणाचीही भाषा होती, असे ओववाइयसुत्तात (आगमोद्धारसमिती प्रत, पृ.७७) म्हटले आहे. भगवईसुत्तात (आगमोद्धारसमिती प्रत, पृ. २३१) देव कोणत्या भाषेत बोलतात असा प्रश्न विचारून देव अर्धमागधी भाषेत बोलतात, असे उत्तर दिले आहे.

प्राकृत काव्यसाहित्याच्या क्षेत्रातही भाषांमधली प्रतिष्ठेची स्पर्धा जोरात चालूच होती. यात सर्वसाधारणपणे जैन आणि जैनेतर लेखक असे दोन तट पडलेले दिसतात. काव्यमीमांसेचा कर्ता राजशेखर याच्या वर्णनात सर्व भाषांविषयी सामान्यपणे उदार दृष्टिकोन दिसून येतो. राजाच्या दरबारात सर्व भाषांमधील कवींना स्थान असले पाहिजे, असे तो म्हणतो. उत्तरेला संस्कृत कवी, पश्चिमेला अपभ्रंश कवी, पूर्वेला प्राकृत कवी

आणि दक्षिणेला पैशाची कवी अशी व्यवस्था त्याने सांगितली आहे (काव्यमीमांसा, पृ. ५४-५५). कवीला संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश आणि मागधी या सर्वच भाषा आल्या पाहिजेत, असे तो म्हणतो. तरी सुद्धा त्या भाषांमध्ये तरतमभाव आहे. सर्व भाषांशी दैनंदिन परिचय राहावा, यासाठी त्याने काही सोपे मार्ग सांगितले आहेत. संस्कृत आणि प्राकृत बोलणाऱ्या बायका कराव्यात. अपभ्रंश बोलणारे नोकर आणि मागधी बोलणाऱ्या दासी ठेवाव्यात. या वर्णनातून एकाच घरात या सर्व भाषा नांदत आहेत, असे चित्र जरी दिसले, तरी त्या भाषांच्या प्रतिष्ठेविषयीच्या राजशेखराच्या कल्पना स्पष्ट दिसतात. काव्यपुरुषाचे शरीर वर्णन करतानाही राजशेखराने भाषाभाषांमधील तरतमभाव दाखवला आहे. संस्कृत हे काव्यपुरुषाचे मस्तक आहे. प्राकृत हे त्याचे बाहू आहेत. अपभ्रंश भाषा म्हणजे काव्यपुरुषाच्या मांड्या आहेत आणि त्याचे पाय पैशाची भाषेचे आहेत (काव्यमीमांसा, पृ. ६). ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांची पुरुषसूक्तात वर्णन केलेली उत्पत्ती आणि राजशेखराच्या कल्पना यांची तुलना करण्यासारखी आहे.

जैन लेखकांनी मात्र प्राकृतविषयी प्रेम आणि आदर दाखविताना संस्कृतविषयी काही प्रमाणात तिरस्कार दाखविला आहे. इसवी सनाच्या आठव्या शतकात होऊन गेलेल्या उद्योतनसूरी या जैन साहित्यिकाने कुवलयमाला नावाची प्राकृतकथा लिहिली आहे. या कथेत एक हकीकत अशी वर्णन केली आहे. (कुवलयमाला, पृ. ७१). एक राजपुत्र रात्री झाडाखाली बसलेला असताना त्याला एक संभाषण ऐकू येते. तो त्या संभाषणाची भाषा कोणती असावी, याविषयी तर्क लढवीत आहे. पहिल्यांदा तो म्हणतो, की हे संभाषण संस्कृतात नाही, कारण संस्कृत ही अत्यंत दुर्बोध आणि कठीण भाषा असून दुर्जनाच्या हृदयाप्रमाणे कठोर आहे. हे संभाषण प्राकृतातही नाही, कारण प्राकृत सज्जनाच्या हृदयाप्रमाणे सुखद असून, तिच्यात सुंदर निसर्गवर्णने वगैरे असतात आणि प्राकृत शब्द संस्कृत सारखे एकमेकांना संधींनी जोडलेले नसतात. हे संभाषण अपभ्रंशही नव्हते, कारण अपभ्रंशात शुद्ध अशुद्ध संस्कृत आणि प्राकृताचे मिश्रण झालेले असते. ते पूर आलेल्या पाण्याप्रमाणे बेबंद असते, पण प्रियकर आणि प्रेयसी यांच्या प्रेमकलहाप्रमाणे सुंदर असते. ते संभाषण या तीनही प्रकारांत बसत नाही, म्हणून ते पैशाची भाषेत असले पहिजे, असे तो राजपुत्र ठरवतो. भाषांविषयीच्या कल्पना इथे अतिशय सुंदर प्रकाराने वर्णन केल्या आहेत.

संस्कृतविषयीची तिरस्काराची भावना जयवल्लभाच्या वज्जालग्गम् या काव्यात दिसून येते. जयवल्लभ म्हणतो, की अमृतासारखे गोड असलेले प्राकृत काव्य ज्यांना म्हणता येत नाही किंवा समजत नाही, त्यांना प्रेमाच्या स्वरूपाची चर्चा करताना लाज वाटली पाहिजे ('अमयं पाइयकव्वं पढिउं सोउं च जे न जाणंति। कामस्स तत्तवतिं कुणंति ते कह न लज्जंति।।', श्लोक २). जयवल्लभ म्हणतो, की प्रेमाने भरलेले, स्त्रियांना आवडणारे, मधुर ध्वनींनी भरलेले सुंदर प्राकृत काव्य उपलब्ध असताना संस्कृत

काव्याकडे कोण कशाला जाईल? ('देसियसद्दपलोट्टं महुरक्खरछंदसंठियं ललियं। फुडवियडपायडत्थं पाइयकव्वं पढेयव्वं।। ललिए महुरक्खरए जुवईजणवल्लहे ससिंगारे। संते पाइयकव्वे को सक्कइ सक्कयं पढिउं।।', वज्जालग्गम्, श्लोक २८-२९). जयवल्लभ प्राकृत काव्याला, प्राकृत कवींना आणि प्राकृत रसिकांना वंदन करतो. (श्लोक ३१).. एक व्यक्ती प्राकृत काव्य म्हणत असताना जर कुणी मध्येच संस्कृतात प्रतिसाद दिला, तर फुलाला दगडाने ठेचल्यासारखे वाईट वाटते (पाइयकव्वुल्लावे पडिवयणं सक्कएण जो देइ। सो कुसुमसत्थरं पत्थरेण दलिउं विणासेइ।।, वज्जालग्गम्, पृ. २१८). परंतु जयवल्लभाचा सर्वांत दाहक उद्रेक पुढील शब्दांत व्यक्त झाला आहे.

डज्झउ सक्कयकव्वं सक्कयकव्वं च निम्मियं जेण।
वंसहरम्मि पलित्ते तडयडतट्टत्तणं कुणइ।। (पृ. २१७)
'संस्कृत काव्याला आग लागो, आणि ज्याने संस्कृत काव्य
रचले, त्यालाही आग लागो. बांबूचे घर जळायला
लागले, की तडातडा आवाज करते.

जयवल्लभाचे हे शब्द वज्जालग्गम् चे संपादक व माझे फर्गसन् महाविद्यालयातले प्राध्यापक कै. मा. वा. पटवर्धन यांना सुद्धा फार तिखट वाटले. वज्जालग्गमच्या प्रस्तावनेत ते म्हणतात, की 'प्राकृत काव्याची ही इतकी अमाप स्तुती प्राकृत भाषेविषयी प्रेम असलेल्या लेखकांनी केलेली आहे, म्हणून आपण समजू शकतो. परंतु जेव्हा हे लेखक संस्कृत भाषेवर तिच्या काठिन्याकडे बोट दाखवून टीका करतात, तेव्हा त्यांनी संस्कृत भाषेवर मोठा अन्याय केला आहे' या ठिकाणी असे म्हटले पाहिजे, की जैन प्राकृत साहित्यिकांची ही संस्कृतविषयीची कल्पना म्हणजे त्यांनी संस्कृत परंपरेला दिलेला उलटा आहेर आहे. जेव्हा सर्व संस्कृतेतर भाषांना संस्कृत वैयाकरणांनी 'अपभ्रंश' हा शब्द वापरून आणि त्या भाषा म्हणजे संस्कृतचे कमी कुवतीच्या लोकांनी केलेले विपर्यस्त रूप आहे, असे म्हणून हिणवले, तेव्हा त्या भाषा बोलणाऱ्या व्यक्तींची प्रतिक्रिया काय झाली असेल हे आपण दूरान्वयाने जयवल्लभाच्या जळफळाटावरून समजून घेऊ शकतो. हीरालाल जैन यांनी असे म्हटले आहे (पाहुडदोहा, प्रास्ताविक, पृ. ६), की जरी 'अपभ्रंश' हा तिरस्काराचा शब्द म्हणून संस्कृत वैयाकरणांनी वापरला, तरी देखील ज्याला आपण अपभ्रंश म्हणतो, त्या भाषेत काव्य लिहिणाऱ्या व्यक्तींना हा शब्द सोडून देशीभाषा हा शब्द वापरला आहे. पुढच्या काळात स्वतःच्या भाषांना अवहत्थ, अवहट्ट, अवहंस ही नावे वापरणाऱ्या लेखकांना या शब्दाचा संस्कृत वैयाकरणांना अभिप्रेत असलेला अर्थ मुळीच अभिप्रेत नव्हता.

संस्कृत आणि प्राकृत भाषांचा परस्पर भाषिक संबंध काय होता, याविषयीची पारंपरिक संस्कृत वैयाकरणांची भूमिका अशी होती, की संस्कृतचा कुवत नसलेल्या लोकांच्या वापरात विपर्यास होऊन प्राकृत भाषा तयार झाल्या. या कल्पनेचे परिष्कृत

रूप प्राकृत व्याकरणांच्या रचनेत सापडते. प्राकृत व्याकरणांचे स्वरूप संस्कृतमध्ये करावयाच्या बदलांचे नियम असे आहे. या प्राचीन भारतीय कल्पनांचा पगडा आधुनिक भाषाशास्त्रावरही बराच होता. परंतु संस्कृतापासून प्राकृत निष्पन्न झाली, या कल्पनेपेक्षा काही प्रमाणात सध्याचे मत वेगळे आहे. संस्कृत ही प्राकृत भाषांची आई म्हणण्यापेक्षा ती कदाचित थोरली बहीण असावी, असे वाटते. वैदिक काळातही प्राकृत किंवा प्राकृतसदृश आर्यभारतीय भाषांचे अस्तित्व आता मान्य होऊ लागले आहे. नंतरच्या काळात अर्थातच संस्कृत भाषेला मोठे मानाचे स्थान असल्याने संस्कृतमधून शब्दसंपत्तीचा ओघ प्राकृत भाषांकडे वाहत होता. तसेच, प्राकृत भाषांमधील स्थानिक शब्दांचे फार मोठ्या प्रमाणावर संस्कृतीकरण होत होते. या दोन्ही प्रक्रियांमधून संस्कृत आणि प्राकृत या भाषांचा इतिहास घडत आलेला आहे. जैनांच्या कल्पनेप्रमाणे अर्धमागधी ही आदिभाषा होती व त्या भाषेतून इतर सर्व भाषांचा जन्म झाला. अशीच कल्पना थेरवादी बौद्ध परंपरेने पाली भाषेविषयी मांडली आहे. पालीला सर्व प्राण्यांची मूळभाषा ('सब्बसत्तानं मूलभासा') असे या परंपरेने म्हटले आहे. आर्. नॉर्मन् (१९८०: ६७) यांच्या म्हणण्याप्रामाणे जैन आणि बौद्ध धार्मिक समजुतींच्या मुळाशी मौर्ययुगातील मागधी भाषेचे राजभाषा म्हणून असलेले मानाचे स्थान आहे. मूळ मागधी भाषेत लिहिलेले लेख पाटलीपुत्राहून अशोकाच्या साम्राज्यात सगळीकडे पाठविले गेले आणि त्या त्या प्रदेशात त्या लेखांचे स्थानिक भाषेत अनुवाद करून ते कोरले गेले. जैन परंपरेने सुचविलेले अर्धमागधीचे श्रोत्यांच्या भाषेत होणारे परिवर्तन याच प्रकारचे आहे.

**भाषांच्या उत्पत्तीबद्दलच्या विविध धार्मिक कल्पना**

| **ब्राह्मणी कल्पना** | **बौद्ध कल्पना** | **जैन कल्पना** |
|---|---|---|
| मूलभाषा | मूलभाषा | मूलभाषा |
| संस्कृत | पाली/मागधी | अर्धमागधी |
| ↓ | ↓ | ↓ |
| इतर सर्व भाषा | इतर सर्व भाषा | इतर सर्व भाषा |
| विकृती/विपर्यास | परिवर्तन | 'हितसुखदायक' |
| अपभ्रंश | 'सका निरुत्ति' | परिवर्तन |





अनुक्रमणिका

या धार्मिक कल्पनांपैकी बौद्ध आणि जैन कल्पनांचे मौर्य काळातील राजकीय परिस्थितीशी असलेले संभाव्य नाते नॉर्मन यांनी दाखविलेच आहे. पतंजलीच्या काळात आर्यावर्ताच्या शिष्ट संस्कृतला पुन्हा सर्वोच्च मान्यता मिळवण्याचा वैयाकरणांनी प्रयत्न केलेला दिसतो. या प्रयत्नांचा संबंध काही प्रमाणात मौर्यांची सत्ता उलथून टाकून, त्यानंतर ब्राह्मणी राजसत्ता प्रस्थापित करणाऱ्या शुंगांच्या कारकिर्दीशी असला पाहिजे, असे मला वाटते. पुष्यमित्र शुंगाच्या कारकिर्दीत ब्राह्मणी वैदिक परंपरेला पुन्हा राजाश्रय मिळाला असावा व संस्कृत भाषेचे पारडे पुन्हा जड व्हायला सुरुवात या काळात झाली असावी, असा विद्वानांचा अंदाज आहे. संस्कृत भाषेमध्ये महत्त्वाचा पहिला शिलालेख हा रुद्रदामन या शक क्षत्रपाचा आहे व तो इसवी सनाच्या दुसऱ्या शतकातला आहे. या शकांनंतर गुप्तकाळात संस्कृत भाषेला एवढे प्राधान्य मिळाले, की हळू हळू सगळीकडे प्राकृत भाषेतला शिलालेखांमधला वापर संपून आपल्याला संस्कृतचा प्रचार झालेला दिसतो. यानंतर सर्वसामान्यपणे संस्कृतचे सर्वोच्च स्थान अबाधित राहिलेले दिसते. प्राकृत भाषांमधील परस्परप्राधान्याची परिवर्तनेही निर्देश करण्यासारखी आहेत. पहिली गोष्ट म्हणजे, मौर्यकाळात असलेले मागधीचे राजकीय प्राधान्य. याची चर्चा वर आलेलीच आहे. परंतु जेव्हा पुढे माहाराष्ट्री प्राकृत वापरणाऱ्या सातवाहनांचे प्राबल्य झाले, तेव्हा मागधीच्या नशिबी फार कठीण काळ आला, असे दिसते. संस्कृत नाटकांमध्ये माहाराष्ट्री ही उत्तम प्राकृत म्हणून वापरली जाते, तर शाकुंतलातला चोर म्हणून धरलेला कोळी, मृच्छकटिकातले शकारासारखे हास्योत्पादक पात्र यांची भाषा मागधी दाखवली आहे. राजशेखराने मागधी भाषेला घरातल्या नोकराचे स्थान दिले आहे. प्राकृत वैयाकरणांनी देखील माहाराष्ट्री आणि मागधी यांच्यांतला हा तरतमभाव कायम ठेवला आहे.

संस्कृत आणि प्राकृत यांच्यांतल्या संबंधांची चर्चा केल्यानंतर शेवटी संस्कृत आणि मराठी यांच्यांतल्या नात्याविषयी थोडेसे सांगून मी हे व्याख्यान संपवणार आहे. सुरुवातीलाच दोन गोष्टी ध्यानात ठेवल्या पाहिजेत. संस्कृत आणि मराठी यांचे संबंध कसे होते, हे समजण्यासाठी मराठीच्या पूर्वी संस्कृत आणि प्राकृत यांचे संबंध काय होते, हे लक्षात घेतले पाहिजे. कारण सर्वसामान्यपणे मराठी माणसाला ज्ञानेश्वरांच्या आधी महाराष्ट्रात काय घडले, याची माहितीच नसते; आणि त्यामुळे नंतरच्या काळात जे घडले, त्याचा आधीच्या परिस्थितीशी काही संबंध होता, की नाही, हे फारसे पाहिले जात नाही. दुसरी गोष्ट अशी, की निदान महाराष्ट्रातल्या संस्कृतच्या अभ्यासकांना मराठी-संस्कृत संबंधांविषयी बोलताना अर्धसत्य बोलण्याची सवय असते. 'सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात न ब्रूयात् सत्यमप्रियम्' या उक्तीप्रमाणे या संबंधांची चांगली बाजू आहे, ती दाखवायची आणि दुसऱ्या बाजूबद्दल मौन बाळगायचे, असे कधी कधी होते. परंतु इथे प्रा. अशोक केळकरांनी सुचविलेला विषय पुन्हा ध्यानात घेतला पाहिजे : संस्कृत आणि मराठी यांचा संबंध हा मायलेकींचा होता, का सासवा-सुनांचा होता? आमच्या

संस्कृतच्या मंडळींना यातले मायलेकींचे प्रेम दाखवायची हौस असते. असे प्रेम नव्हते, असे मला म्हणायचे नाही. पण सासुरवासही तितक्याच प्रमाणात चालू होता, हेही सत्य आहे, आणि या सासुरवासाबद्दल मी काही गोष्टी सांगणार आहे.

मराठीच्या इतिहासात मुकुंदराजांच्या काळापासून संस्कृत आणि मराठी यांच्यांत असा तणाव अस्तित्वात असल्याचे दिसून येते. ही अशी परिस्थिती फक्त महाराष्ट्रातच होती, असे नाही, तर भारताच्या सर्व प्रदेशांमध्ये स्थानिक भाषा आणि संस्कृत यांच्यामध्ये असाच तणाव होता. आपल्या आता हेही ध्यानात येईल, की हा तणाव नवीन नाही, तर संस्कृतप्राकृत संबंधांचेच हे नवे रूप आहे. मुकुंदराजांनी विवेकसिंधू हा वेदांतग्रंथ मराठीमध्ये ज्ञानेश्वरीच्या आधी लिहिला आहे. ज्यांना संस्कृत कळत नाही, त्यांच्यापर्यंत ज्ञान पोहोचविण्यासाठी हा ग्रंथ मराठीत केला आहे असे मुकुंदराज म्हणतात.

'जयासी नाही प्रतीती। नेणती तर्क मुद्रेची स्थिती।
तयालागी मराठिया उक्ती। केली ग्रंथरचना।।'

विवेकसिंधू, उत्तरार्ध, प्रकरण ११, ओवी १३२

ज्ञानेश्वरांनी केलेले 'देशीकार लेणे' आपल्या परिचयाचेच आहे. परंतु 'माझा मऱ्हाठा चि बोलु क वतिकें। परि अमृतातें ही पैजेंसीं जींके' ज्ञा. ६.१४ ही ज्ञानेश्वरांची उक्ती ऐकल्यावर आता आपल्याला या वचनाच्या मागे उभी असलेली जयवल्लभाच्या वज्जालग्गम्मध्ये दिसणारी 'अमयं पाययकव्वं' ही उक्तीही आठवायला हवी. महानुभावी नागदेवाचार्य केशवराजांना चक्रधरांची वचने संस्कृतात लिहू नकोस, असे सांगतात. 'नको गा : केशव देया : येणे माझिये स्वामीचा सामान्यु परिवारु नागवैल की.' हे शब्द म्हणजे बौद्ध आणि जैन परंपरांनी सुरुवातीच्या काळात धर्मग्रंथांच्या संस्कृतीकरणाला केलेल्या विरोधाची आठवण करून देतात.

संस्कृत आणि मराठी यांच्यांतला तणाव हा नंतरच्या काळातही कायम राहिला आहे. महीपतीने एकनाथांच्या आणि रामदासांच्या अशा काही कथा सांगितलेल्या आहेत. एकनाथांनी लिहिलेले मराठी भागवत हे काशीच्या पंडितांनी गंगेत फेकून दिले होते, आणि मराठी लिहिण्यावरून एकनाथ आणि त्यांचा मुलगा हरिपंत यांच्यांत वितुष्ट आले होते, अशा कथा महीपतीने सांगितलेल्या आहेत. तसेच रामदास, शिवाजी आणि गागाभट्ट यांच्याही अशाच कथा आहेत. राज्याभिषेकांनतर गागाभट्ट शिवाजीला, तू आता अपभ्रष्ट मराठी, आणि या अपभ्रष्ट मराठीत रचना करणाऱ्या रामदासाची कास सोडून दे. मी तुला संस्कृत शिकवितो, असा आग्रह धरीत आहेत. या कथांकडे जरी इतिहास म्हणून पाहता येत नाही, तरी त्या काळच्या भाषिक- सामाजिक स्पर्धेची या कथांवरून आपल्याला चांगली कल्पना येते. एकनाथांनी स्वतःच मराठीची कैफियत

आपल्या भागवतात मांडली आहे. (१.१२१-१३०, २९. १६.१९).

आता वंदू प्राकृत कवीश्वर। निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर।
नामदेव चांगदेव वटेश्वर। ज्यांचे भाग्य थोर गुरुकृपा।।
जयांचे ग्रंथ पाहतां। ज्ञान होय प्राकृतां।
तयांचे चरणी माथा। निजात्मता निजभावें।।
संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी। मा प्राकृतीं काय उणीवी।
नवी जुनी म्हणावीं। कैसेनी केवीं सुवर्णसुमनें।।
कपिलेचें म्हणावे क्षीर। मा इतरांचे तें काय नीर।
वर्णस्वादें एकचि मधुर। दिसे साचार सारिखें।।
जें पाविजे संस्कृत अर्थे। तेंचि लाभे प्राकृतें।
तरि न मनावया येथें। विषमचि ते कायी।।
देशभाषावैभवें। प्रपंचपदार्थी पालटली नावें।
परी रामकृष्णादिनामा नव्हे। भाषावैभवें पालटूं।।
संस्कृतवाणी देवें केली। तरी प्राकृत काय चोरापासूनि झाली।
असोतु या अभिमानभुली। वृथा बोली काय काज।।
आता संस्कृता किंवा प्राकृता। भाषा जाली जे हरिकथा।
ते पावनची तत्वतां। सत्य सर्वथा मानिली।।
सद्‌गुरुकृपा समर्थ। तेणें कृपें श्रीभागवत।
वाखाणिलें जी प्राकृत। शुद्ध मथितार्थ सोलीव।।
जनार्दनकृपादृष्टि। माझ्या मराठ्या आरिख्या गोष्टी।
रिघाल्या एकादशाचे पोटीं। स्वानंदतुष्टी निजबोधें।।
संस्कृत प्राकृत परवडी। सज्ञान सेविती स्वानंदगोडी।
गाय काळी आणि तांबडी। परि दुधी वाकुडी चव नाही।।
तेवी संस्कृतप्राकृतभाखा। ब्रह्मासी पालट नाही देखा।
अभय अभेदें वदला एका। साह्य निजसखा जनार्दन।।

इथे एकनाथांचे शब्द वाचताना आपल्या ध्यानात येईल, की मराठीला उद्देशून त्यांनी सर्वत्र 'प्राकृत हा शब्द वापरला आहे व त्यामुळे इथे संस्कृत-प्राकृत संबंधांच्या प्राचीन इतिहासाचीच पुनरावृत्ती होत आहे. मोरोपंतांनी त्यांच्या मंत्ररामायणाच्या शेवटी केलेली मराठीची वकिली अशाच प्रकारची आहे.

रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं
नाहीं हानि कदापि अन्यकविहीं तें वर्णितां प्राकृतीं।
मुक्तांचा रचिलाचि हार पहिला जो रेशिमाच्या गुणें
तो कार्पासगुणे करूनि करितां काय प्रभेला उणें।।
केलें पात्र सुवर्णाचें कीं विरूपशि खापरी।

लाविता तेथ संहारी तम, दीपशिखा परी।।

श्रीवाल्मीकिप्रभृतिमुनिहीं वर्णिती रामलीला
मादृक्षाही मुदितहृदये काय गावें न तीला?
श्रीकण्ठेन्द्राद्यमरपरिषत्सेव्यगंगाप्रवाही
संध्या स्नानादिक न करणें काय या मानवाहीं।।

गीर्वाणें राघवाचें यश रसिकजना लागतें फार मिष्ट
'तैसें न प्राकृतानें अचतुर म्हणती मानिती ते न शिष्ट।
पीतां गोक्षीर कार्तस्वरमणिचषकें देतसे जें चि गोडी
सारङ्गाला पलाशद्रुमदलपुटकें सेवितां तें न सोडी।।

माजी सत्कृति दूषिली जरि खळें उच्छृंखळें आग्रहें
सेवावीच परंतु नित्य रसिकें हे सद्गुणाच्या गृहे।
चंडाळ त्रिदशापगेत वमला की धेनुला स्पर्शला
त्यांचे श्रोत्रियदेवसेव्य पयही, त्याही सदा निर्मळा।।

संस्कृत व मराठी संबंध तपासून पाहताना आणखी एक गोष्ट ध्यानात ठेवायला हवी, की संस्कृत म्हणजे काय आणि मराठी म्हणजे काय, यांबद्दल मुळातच काही गोंधळ आपल्या मनात असतो. या दोन भाषा वस्तुतः मायलेकी असोत किंवा नसोत, त्यांचा परस्परसंबंध हा व्यवहारात अभेद्य झाला आहे. ज्ञानेश्वरांच्या 'पसायदाना' तल्या 'पसाय' शब्दाचा अर्थ आज आपल्याला 'प्रसाद' हा शब्द वापरून सांगावा लागतो. म्हणजे भाषाशास्त्रीय दृष्ट्या मूळ 'प्रसाद' या शब्दाचा जुन्या मराठीत प्राकृताद्वारा 'पसाय' हा अपभ्रंश झाला. परंतु आजच्या मराठीत तो अपभ्रंश मागे पडून, पुन्हा मूळ संस्कृत शब्द शिरलेला आहे. म्हणजे ज्याला आपण आजचे मराठी म्हणतो, ती भाषा ज्ञानेश्वरांच्या भाषेपेक्षा अधिक संस्कृतमय आहे. राज्यव्यवहाराचे मराठीकरण करण्यासाठी शिवाजी महाराजांच्या आज्ञेने जो 'राज्यव्यवहारकोश' निर्माण झाला, तो वापरून वस्तुतः मराठीचे संस्कृतीकरणच होऊ शकते. आपल्या आठवणीतच वीर सावरकरांनी मराठीच्या शुद्धीकरणाचे केलेले प्रयत्न हे अशा प्रकारचे मराठीच्या संस्कृतीकरणाचेच प्रयत्न आहेत. मराठीला समृद्ध करण्यासाठी संस्कृतचा वापर हा असा शतकानुशतक चालू आहे. तसेच, महाराष्ट्रात वापरल्या जाणाऱ्या संस्कृतावर मराठीची छाप नकळत पडलेली आहे. नागोजीभट्टासारखा महाराष्ट्रीय संस्कृत वैयाकरण एखाद्या लांबलचक चर्चेच्या शेवटी त्या चर्चेचा सारांश देताना 'इति गोलार्थः' असे म्हणून जातो. मराठी 'गोळाबेरीज' या शब्दाचा हा नकळत झालेला संस्कृत अवतार आहे.

संस्कृत-प्राकृत संबंधाच्या इतिहासाच्या या चर्चेपासून आपल्याला बरेच काही

शिकण्यासारखे आहे. संस्कृत व मराठी यांचा संबंध आज कसा असावा? महाराष्ट्रातल्या सध्याच्या भाषिक व सामाजिक राजकारणात न शिरता इतिहासाने आपल्याला काय धडे शिकवले आहेत, तेवढेच मी सांगणार आहे. संस्कृत-प्राकृत संबंधाच्या इतिहासाने आपल्याला बरेच पर्याय उपलब्ध करून दिले आहेत. आपण संस्कृतचा आत्यंतिक अभिमान धरून मराठीला पतंजलीचा 'अपभ्रंश' हा शब्द वापरून हिणवू शकतो व त्याची प्रतिक्रिया म्हणून मराठीचा आत्यंतिक अभिमान धरणारी मंडळी जयवल्लभाचे उदाहरण पाहून 'जळो ते संस्कृत' असे म्हणू शकतात आणि म्हणतात. परंतु आपण हे विसरू शकत नाही, की प्राकृताला 'अपभ्रंश' म्हणून हिणविणाऱ्या पतंजलीची मातृभाषा बहुधा प्राकृतच होती व 'जळो ते संस्कृत' म्हणणाऱ्या जयवल्लभाची प्राकृत ही संस्कृत शब्दांनी खच्चून भरलेली आहे. म्हणजे प्रत्यक्षात असलेले या भाषांचे परस्परावलंबन नाकारून ही मंडळी एकमेकांचा दुस्वास करण्यात आणि एकमेकांना खाली पाडण्यात गुंतलेली आहेत. या प्राचीन भूमिकांमधून भाषांकडे पाहण्याची अनैतिहासिक, अवास्तव आणि धर्मभेदाने व जातिभेदाने दूषित वृत्ती भारताच्या इतिहासात निर्माण झाली, हे अप्रिय सत्य आपण समजून घेतले पाहिजे. परंतु ही अशी परस्पर चिखलफेक चालू असताना काही शांत डोक्याची वाक्पतिराजासारखी सुबुद्ध माणसेही सुदैवाने होऊन गेली, की ज्यांनी संस्कृत आणि प्राकृत यांचे परस्परपोषकत्व ओळखले होते. आजही आपल्याला अनुकरणीय असलेल्या वाक्पतिराजाच्या (गउडवहो, श्लोक ६५) शब्दांनी मी हे व्याख्यान संपवितो.

> उम्मिलई लायण्णं पययच्छायाए सक्कयवयाणं।
> सक्कयसक्कारुक्करिसणेण पययस्स वि पहावो।।
> (उन्मीलति लावण्यं प्राकृतच्छायया संस्कृतवचसाम्।
> संस्कृतसंस्कारोत्कर्षणेन प्राकृतस्यापि प्रभावः।।)

*संस्कृत वाणीचे सौंदर्य प्राकृताच्या छायेने उमलते आणि प्राकृत वाणीचाही प्रभाव संस्कृताच्या संस्काराद्वारा प्राप्त झालेल्या उत्कर्षाने वाढतो.*

**इतिवचन**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे २०:०२:१९९३ रोजी परिषद आणि मराठी अभ्यास परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने कृ. पां. कुलकर्णी जन्मशताब्दीप्रीत्यर्थ दिलेले भाषण. हे नंतर थोड्या संस्कारित रूपात लेखकाच्या आगामी पुस्तकात एक प्रकरण म्हणून समाविष्ट होईल : संस्कृत आणि प्राकृत भाषा : व्यवहार, नियमन, आणि शास्त्रचर्चा, पुणे : शुभदा-सारस्वत प्रकाशन, बहुधा १९९५ पूर्वार्ध.

○○○

# 'सूटेबल बॉय' मराठीत आणताना

अरूण साधू

विक्रमसेठ यांच्या 'सूटेबल बॉय' या प्रदीर्घ कादंबरीचे नुकतेच मराठीमध्ये भाषांतर पूर्ण केले. त्यासाठी जवळ जवळ एक वर्ष पूर्ण द्यावे लागले. बाकी सर्व कामे बाजूला ठेवून आपण या भाषांतराच्या झपाट्यात ओढले जाऊ, अशी आधी कल्पना नसल्याने हे काम हाती घेतले. आतापर्यंत कोणतेच भाषांतर केले नव्हते. करण्याची इच्छाही झाली नव्हती. फक्त कधी तरी दस्तोवस्कीचे 'कारामाझोव ब्रदर्स' किंवा ऑस्कर वाइल्डचे 'पिक्चर ऑफ डॉरियन ग्रे' या कादंबऱ्यांचे भाषांतर करण्याचा मोह झाला होता. पण ते राहून गेले. एका बेसावध क्षणी 'सूटेबल बॉय' चे भाषांतर करण्याची इच्छा व्यक्त केली व ते अंगावर चालूनच आले.

भाषांतराच्या प्रक्रियेविषयी बोलण्याआधी ते करण्याची इच्छा तरी कशी निर्माण झाली, हे सांगायला हवे. कारणे वेगवेगळी आहेत. प्रस्तुत लेखक एक कादंबरीकार आहे, हे वाचकांना ठाऊक असेलच. गेली आठ-दहा वर्षे प्रक्रिया सुरू असलेली स्वतःची एक कादंबरी रेंगाळत चालली आहे. या कादंबरीसाठी थोडे संशोधन करावे लागले, थोडे हिंडावे लागले. आणखी हिंडावे लागणार आहे. कादंबरीचा पट मोठा आहे व कालखंडही विस्तृत आहे. ती पूर्ण करण्यासाठी पुरेसा वेळ व आर्थिक सवड मिळत नाही, अशी कुरकूर चालू असतानाच 'सूटेबल बॉय' हाती आली.

इंग्रजीमध्ये ललित वाङ्मय लिहिणाऱ्या भारतीय लेखकांविषयी काही पूर्वग्रह तयार झाले होते. बहुतेक भारतीय लेखकांच्या इंग्रजीतून लिहिलेल्या कादंबऱ्या बारकाईने वाचल्या, तर त्या खास पाश्चात्त्य वाचकांच्या रुचीस पसंत पडतील, अशा पद्धतीने जाणीवपूर्वक लिहिलेल्या वाटतात. त्यामुळे त्यांच्यामध्ये काही खास युक्त्या व समीकरणे वारंवार आढळतात. फारसे तपशिलात न जाता असे म्हणता येईल, की पाश्चात्त्यांच्या ग्रह-पूर्वग्रहांमधून त्यांनी आपल्या समोर भारताची व भारतीय समाजाची जी प्रतिमा उभी केलेली असते, तीच प्रतिमा त्यांना आवडते, म्हणून तिचा रंग अधिक गडद करण्याची धडपड करणारे असे भारतीय इंग्रजी लेखन असते. त्यामुळे भारतीय इंग्रजी वाङ्मयाची सर्जनशीलता क्षीण झालेली असते; त्यातील बरीच चित्रणे कृतक व पुष्कळ वेळा वास्तवापासून दूर गेलेली असतात. दुसऱ्याने निर्माण केलेल्या चौकटीत बसण्याची धडपड केल्याने उत्स्फूर्तपणा कमी झालेला असतो. त्यामुळेच काही अपवाद

सोडता जागतिक वाङ्मय-क्षेत्रात आजपर्यंत भारतीयांचे इंग्रजी लेखन सपक व दुय्यम दर्जाचे मानले जाते.

हा पूर्वग्रह घेऊनच 'सूटेबल बॉय' वाचावयास घेतले; पण विक्रम सेठने सुखावह निराशेचा उत्कृष्ट आनंद दिला. साऱ्या पूर्वग्रहांना छेद देणारी ही कादंबरी झपाटून गेली. रसाळ, सुंदर व सोपी इंग्रजी भाषा; सरळ कालक्रमाने येणारे, पण सपाट मैदानावरील नदीप्रमाणे संथपणे वाहत जाणारे निवेदन; जिवंत, भरदार पात्रांची रेलचेल; त्यांचे एकमेकांशी असलेले गुंतागुंतीचे संबंध-सोपेपणातून व सरळ निवेदन-शैलीतून किती गहन व व्यापक अर्थ व्यक्त होऊ शकतो, असे कादंबरी वाचून वाटले. शिवाय कादंबरीचा विषयही फारच रसपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण. सन १९४९ ते ५१ असा अवघ्या दोन अडीच वर्षांचा कालखंड. स्वातंत्र्यानंतरच्या या अत्यंत महत्त्वाच्या कालखंडातील भारताचे मर्मभेदी चित्रण विक्रम सेठने या कादंबरीत प्रभावीपणे केले आहे. प्रधानमंत्री–मंत्र्यापासून ते अस्पृश्य, भूमिहीन मजुरापर्यंत आणि नबाब-जमीनदारांपासून ते वेश्या, गुंड, पोलिस व भडक माथ्याच्या तरुण आंदोलकांपर्यंत अशा वैविध्यपूर्ण व्यक्तिचित्रणाने सेठ यांनी भारतीय समाजाचे नेमके छेद घेऊन चित्ररचनेचा प्रयत्न केला आहे. स्वातंत्र्यानंतर सत्ताधारी काँग्रेस पक्षातील अंतर्गत संघर्ष, नेहरू-टंडन झगडा, हिंदू-मुस्लिम संघर्षाची बीजे, मंदिर-मस्जिदवाद, भारतीय प्रशासकीय सेवेचे स्वातंत्र्यानंतर होत असलेले भारतीयीकरण, राजकीय पुढाऱ्यांचा प्रशासनात वाढत चाललेला हस्तक्षेप, हिंदू - कोड बिलावरील वादळ, कलकत्त्याचे कमी होत चाललेले व्यापारी महत्त्व, ब्रिटिश उच्चभ्रू शिक्षणावर पोसलेली खानदानी संस्कृती व स्वातंत्र्यामुळे नव्याने निर्माण झालेल्या संधीचा फायदा घेऊन झपाट्याने सुबत्ता मिळविणारा नवा वर्ग यांच्यांतील संघर्ष, जमिनदारीविरोधी कायद्याला होत असलेला प्रखर विरोध, हिंदीची भाषिक दादागिरी, लोकशाहीसाठी जाती-जातींचे राजकारण अशी सारी अत्यंत गुंतागुंतीची पार्श्वभूमी सहज जिवंतपणे उभी करून सेठ यांनी तीन-चार कुटुंबांची कथा सांगितली आहे. कथेचे मुद्दे आहेत, ते सारे सनातन प्रेम, संसार, विवाह व त्यांच्याशी संबंधित असलेली सामाजिक बंधने. अगदी गाभ्याचा विषय सांगायचा झाला, तर आपल्या उपवर कन्येसाठी स्वतःच्या पोट-जातीतील स्थळ शोधून, तिचे लग्न करून देण्याचा. म्हणजे भारतातील साऱ्याच लोकांच्या जिव्हाळयाचा हा कळीचा मुद्दा हाती धरून विक्रम सेठने एकूणच भारतीय उपखंडातील समाजस्थितीचे, वेगाने बदलणाऱ्या परिस्थितीचे व भारतीय स्वभावाचे रंगविलेले चित्र जिवंत, प्रत्ययकारी व अस्वस्थ करणारे आहे. आपल्याला जे करायचे आहे, ते विक्रम सेठने आधीच करून दाखविले, म्हणून तोंडातून वाहवाची दाद निघाली व असे वाटले, की मराठी वाचकांनी ही कादंबरी वाचायला हवी.

आणखी एक नाजूक मुद्दा. मला कवितेविषयी फारसे प्रेम नाही, असा मी समज

करून देत असतो. परंतु कवितेची प्रक्रिया, कवींची मानसिक प्रक्रिया या गोष्टींमध्ये पूर्वीपासूनच मला खूप रस आहे. कवितांचे वाचन शिस्तीने झालेले नाही. पण ही उत्सुकता आहे. प्रयोग म्हणून याही प्रांतात मुशाफिरी केलेली आहे. 'त्रिशंकु' या १९८० साली प्रकाशित झालेल्या कादंबरीतील किमान दोन पात्रे कवी आहेत व त्यांच्या सर्जनशील मानसिकतेचा शोध घेण्याचा त्यात प्रयत्न आहे. सध्याच्या लांबलेल्या कादंबरीतही कवितेचा ध्यास असलेले एक पात्र आहे व तिच्या कविता सर्व कादंबरीभर विखुरल्या आहेत. याही एका कारणाने विक्रम सेठच्या या कादंबरीने तार छेडली असणार. कारण 'सुटेबल बॉय' मध्ये एक कवी आहे व कवितांची रेलचेल आहे. सूर जुळले. स्वेच्छेने भाषांतराचे काम हाती घेतले. मग लक्षात आले, की हे काम वाटते तेवढे सोपे नाही.

पहिली गोष्ट म्हणजे, कादंबरीची दमछाक करणारी १३४९ पानांची लांबी. विक्रम सेठने कादंबरीवर काम करून ती पूर्ण करण्यास आठ वर्षे घेतली. कादंबरी लिहिणे हे अतीव समाधान देणारे व उन्नयनकारक कृत्य असले, तरी ते मोठे शारीरिक पीडा देणारेही काम असते, असा अनुभव आहे. भाषांतर करताना मूळ सर्जनशील काम दुसऱ्याचे असल्याने या शारीरिक पीडेची अधिक जाणीव होते. अर्थात कधी कधी भाषांतरात तार लागली, एकतानता लाभली, तर त्याचाही आनंद समाधान देणारा असतो, यात शंका नाही. यापूर्वी भाषांतराची सवय नव्हती. बरेचसे वृत्तपत्रीय लिखाण इंग्रजीतून झालेले आणि संवेदनशीलता म्हणजे कोणत्याही दडपणाला बळी पडणे, असाही अर्थ होतो. म्हणून संवेदनशील लेखकाची भाषांतर करताना मोठीच पंचाईत होत असावी. इंग्रजी वाचताना तसाच विचार करण्याचे भाषेला नकळत वळण लागले व तेच इंग्रजी वळण आपण मराठीत उतरलो, की शैलीमध्ये येते. तसा अनुभव पहिले प्रदीर्घ लिखाण केले, तेव्हा आला. १९६५-६६ मध्ये 'माणूस' मध्ये 'आणि ड्रॅगन जागा झाला' ही मालिका लिहिली होती. ती सारी इंग्रजी पुस्तकांचा अभ्यास करूनच. ती जेव्हा पुढे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली, तेव्हा पुस्तकातील भाषेबद्दल काही जाणकारांनी फाडून खाल्ले होते. कारण इंग्रजीच्या रुळांवरून चालण्याची सवय झाली, की तेच वळण भाषेला पडावे, असे त्या लेखमालेत झाले असावे.

तसेच 'सूटेबल बॉय' च्या बाबतीत होण्याची धास्ती वाटत होती. मध्ये स्वतःचे एवढे मराठी लिखाण केले, पण इंग्रजीतून मराठीत येताना किंवा मराठीतून इंग्रजीत जाताना त्या त्या भाषेचा वाकडेपणा किंवा वैशिष्ट्ये म्हणा वाटल्यास- काही काळ तरी दुसऱ्या भाषेत अवतरतोच. वळण लवकर बदलत नाही. कादंबरीचे भाषांतर करायचे असेल, तर हे होऊ देता कामा नये, असे मनाशी ठरविले. ठरविणे सोपे, पण करणे कठीण आणि मराठी कादंबरीत जर तसे वळण आले, तर ती वाचकांच्या माथी मारण्यात अर्थ नाही. आता या वेळी प्रुफे वाचताना तरी असा दिलासा वाटतो, की

सूटेबल बॉय' मराठीत आणताना कादंबरीला सहज मराठी वळण देण्यात प्रस्तुत लेखक बऱ्याच प्रमाणात यशस्वी झाला असावा.

त्यासाठी नेमके काय केले, हे नीट उलगडून सांगता येणार नाही. पण एक शिस्त पाळली. अगदी सुरुवातीला प्रथम कादंबरी हाती घेतली, तेव्हा ती वाचून काढली होतीच. भाषांतराचा विचार मनात आला, तेव्हा दुसऱ्यांदा समग्र वाचून काढली आणि प्रत्यक्ष कागदावर भाषांतराला बैठक मारण्याआधी पूर्वतयारी म्हणून तिसऱ्यांदा वाचून काढली. त्यामुळे कादंबरीकारास नेमके काय सांगायचे आहे, याचा अंदाज आला; कादंबरीच्या पृष्ठभागाखालील खोलीचे भान आले, तीमधील पात्रे आपण स्वतःच निर्माण केली आहेत, असा आत्मविश्वासपूर्ण भास होऊ लागला. विक्रम सेठला नेमके काय सांगायचे आहे, असे कोणी विचारले, तर ते शब्दांत सांगता येणार नाही. पण काय सांगायचे आहे, हे निश्चित कळले आहे. त्यामुळे त्याच्या वाक्या- वाक्याचे भाषांतर करताना इंग्रजीच्या रुळांना चिकटून राहण्याची गरज नाही, असा आत्मविश्वास प्राप्त झाला. सर्कशीतील पाळण्यावरील खेळ करणाऱ्या कसरतपटूप्रमाणे पाळण्याच्या झोक्याची संगीतमय गती कुंठित न करता हवेत भरारी मारून, त्याच गतीने दुसऱ्या पाळण्याला हात घालण्याचा विश्वास आला.

प्रत्यक्ष भाषांतरासाठी बैठक मारताना आणखी एक गोष्ट साध्य झाली. भाषांतराचे अर्धे अधिक लेखन लेखनिकाद्वारे केले आहे. त्यामुळे वेळेची शिस्त लागली. जो भाग आज भाषांतर करून सांगायचा आहे, तो लेखनिक यायच्या आधी वाचून ठेवू लागलो. हे चौथे वाचन आणि प्रत्यक्ष भाषांतर सांगतानाचे पाचवे वाचन. अर्थाचे, भावाचे पूर्णपणे आकलन झाले, की मग तोच अर्थ व तोच भाव स्वतःच्या भाषेत नेमकेपणाने, मोकळेपणाने व सहज प्रवाही भाषेत आपण सांगू शकतो, याचा प्रत्यय आला.

परंतु त्याचबरोबर मूळ कादंबरीकारावर कोणत्याही प्रकारचा अन्याय होऊ नये, त्याला अभिप्रेत असलेल्या गर्भित अर्थाला बाधा येऊ नये किंवा त्याचा अनर्थ होऊ नये, याची काळजी घेण्यासाठी मूळ कादंबरीतील शब्दांचे व वाक्यांचे बोट पकडूनच मराठीत उतरायला हवे.

तसे करताना मात्र मराठी भाषेच्या वापरामध्ये जो आळशीपणा शिरला आहे, त्याचा अनुभव आला. हा आळस आपण बोलताना जी मराठी वापरतो, त्यामध्ये तर असतोच; पण लिहिण्याच्या मराठीमध्ये देखील असतो. एवढेच नव्हे, तर भाषेच्या पूर्ण क्षमतेला हात न घालता वरवरची भाषा वापरून निभावून नेण्याची आळशी वृत्ती इतरांच्या नव्हे, तर आपल्या स्वतःच्याही ललित लिखाणामध्ये आढळत असल्याची जाणीव झाली. 'तिकडे त्या दिवशी ते हे आणायला गेलो असताना तो आपला हा भेटला आणि तो काही तरी म्हणाला, काय म्हणाला बरं?' अशी वाक्ये ज्याप्रमाणे आपल्या बोलण्यात येतात, त्याच दर्जाची लिहिण्यातही येतात. पहिली गोष्ट, म्हणजे लिहिण्यात

नेमकेपणा नसतो. कादंबरीच्या रचनेविषयी व शैलीविषयी इथे चर्चा करायची नाही. तर भाषेच्या कसाविषयी सांगायचे आहे.

बोलताना कधी कधी असा सपाटपणा खपू शकतो. तोही योग्य नव्हे. परंतु निदान लिहिताना तरी वातावरणाच्या, भावनांच्या क्रियांच्या विविध मिती, परिमाणे, रंग, कंगोरे व गर्भित अर्थ दर्शविण्यासाठी नेमक्या शब्दच्छटा शोधून त्या चपखलपणे वापरण्याचे कष्ट आपण सहसा घेत नाही. सामान्य लोकांना समजेल, अशी साधी व सोपी भाषा वापरावी, या कल्पनेचे आपण एवढे अवडंबर माजविलेले असते, की त्यामुळे शब्दच्छटा वापरण्याची सवय जात चालली आहे. (किंवा ती लागलीच नसेलं) तिजोरीत भरपूर धनसंपदा असूनही उपासमार करून घेणाऱ्या कवडीचुंबकाप्रमाणे मराठी भाषकांची अवस्था होते आहे. शासकीय व्यवहारकोशातील किती तरी शब्द पचनी पडून ते ग्रामीण भागातील सामान्य लोकांच्या तोंडी रुळलेले आहेत. प्रमाण मराठी भाषेत मात्र या शब्दांची टिंगल करण्याची प्रथा अद्यापही चालू आहे. शब्दसंपदा वाढावी, ती आकुंचित होत आहे. शहरी आणि ग्रामीण भाषेतून किती तरी शब्द नाहीसे होत आहेत. असो. हे विषयांतर झाले. भाषांतर करताना हे अधिक जाणवले, म्हणून.

शब्दच्छटांचे सांगायचे तर हे वाक्य बघा : ही लुकड् विथ डिसमे. या इंग्रजी रचनेत पाहणाऱ्याचा एक नेमका विशिष्ट भाव दर्शवायचा आहे. त्या त्या वेळच्या गरजेप्रमाणे 'डिस्मे' च्या ठिकाणी किती तरी विविध भाव दर्शविणाऱ्या छटा वापरता येतात. डिसूगस्ट, डिस्ट्रेस, डिस्परेशन, डिसअपॉईन्टमेन्ट, कॉन्स्टर्नेशन किंवा एम्बॅरॅसमेन्ट; शिवाय 'विथ' हा शब्द काढून 'ही लुकड् अँक्शस, डिस्टर्बड्, नर्व्हस, वरीड, हॅरीड......' आणखी किती तरी. इंग्रजीत बोलताना आपण या छटा वापरतोही. पण मराठीत आपण या छटा उलगडून दाखविण्याचा प्रयत्न करीत नाही, आळस करतो. एकच एक सोपा शब्द वापरून वेळ निभावून नेतो. सुरुवातीला वाचकांना खटकले, तरी चालेल, पण शब्द वापरण्याचा आपला कृपणपणा सोडून छटा शोधीत जाण्याचा प्रयत्न केला, म्हणून 'त्याने दिलासायुक्त मंद उसासा सोडला' किंवा 'विश्वासयुक्त निःश्वास टाकला' असे शब्दप्रयोग या भाषांतरात आढळतील. कधी अपरिहार्य झाले, तर एखाद्या छटेसाठी वाक्ये वापरावी लागतात. जेथे जमले, तेथे शब्दयोजना केली.

दुसरी एक गोष्ट अशी, की विक्रम सेठच्या वर्णनांमधील निसर्ग केवळ तपशिलांनी खुलला आहे, असे नसून कथानकातील चिवट व वारंवार येणाऱ्या अर्थपूर्ण संदर्भाने तो समृद्ध आहे. आपल्याला थोडीशी फुला- झाडांची आवड असूनही त्यांची तपशीलवार ओळख करून घेण्यासाठी आपण सवड काढली नाही आणि चार नेहमीच्या परिचयाच्या पाना-फुलांपलीकडे दृष्टी किंवा संदर्भ फिरले नाहीत. ऑस्कर वाइल्डचे 'पिक्चर ऑफ डोरियन ग्रे' भाषांतराच्या अभिलाषेने घेऊन बसलो होतो. त्या वेळी त्यातील जड-जवाहीर, रत्ने, हिरे यांची रसपूर्ण वर्णने वाचून थक्क व्हायला झाले. तेव्हापासून

तपशिलाचा सोस लागला.

'सूटेबल बॉय' चे भाषांतर करताना अनेक ठिकाणी सोयीसाठी व कित्येक ठिकाणी संस्कृतिविशिष्ट भारतीय शब्दयोजनेमुळे सहज संक्षेप साध्य झाला. उदाहरणार्थ: तिने चांगले कळीदार पान निवडून कुशलपणे त्याच्या शिरा काढल्या, चुना व कात लावून नाजूक हातांनी अडकित्त्याने बारीक सुपारी कातरली. हे वाक्य स्पष्टीकरणे दिल्याशिवाय इंग्रजीमध्ये परकीय वाचकांस समजणार नाही. तसेच, अन्नाचे, जेवणाचे, भारतीय संगीताचे, अध्यात्म, धर्म, पूजा, देव, आरत्या, अनुष्ठाने यांचे संस्कृतिविशिष्ट संदर्भ इंग्रजीत आणताना लांब पल्ल्यानेच आणावे लागतात. भारतीय भाषांमध्ये त्यांचा संक्षेप अपरिहार्यपणे व सुलभपणे होतो.

पण अशा सहज संक्षेपाच्या ओघामध्ये निसर्गाचे अर्थगर्भ संदर्भ सुटणार नाहीत, याची काळजी घेण्याचा प्रयत्न केला. या कादंबरीत वटवृक्ष, जॅकरंडा, गुलाब, मोगरा, गुलमोहर, कडूलिंब, गंगानदी व अशा कित्येक वृक्षवल्लींचे, फुलझाडांचे, वेलींचे, पक्ष्यांचे गुंतागुंतीचे सांकेतिक संदर्भ आहेत. एका ठिकाणी भाषांतराच्या सोयीसाठी एखादा उल्लेख डावलला, तर दुसरीकडे अर्थपूर्ण संदर्भ उपटतो व पुन्हा मागे जावे लागते, म्हणून कादंबरीतील इंग्रजी नावाने आलेल्या झाडे, झुडुपे, वेली, फुले यांची यादी करून तज्ज्ञांच्या मदतीने त्यांची शक्यतो मराठी नावे शोधण्याचा प्रयत्न केला. जेथे मराठीत नाहीच, तेथे इंग्रजी नावे राहू दिली. लॅबर्नम वृक्षाला मराठीत नाव सापडले नाही. बंगालीत मात्र अमलताश असे सुंदर नाव आहे, ते वापरले. जॅकरंडाचे तसेच राहू दिले. अशा तडजोडी केल्या. पण त्या करताना संदर्भ गाळले जाणार नाहीत. याची खबरदारी घेतली.

संक्षेपाविषयी आणखी थोडे. सध्या कादंबरी मुद्रित होत असल्याने मराठी पुस्तकांची किती छापील पाने होतील, याचा अद्याप अंदाज आला नाही. मूळ कादंबरी १३४९ अशा गच्च छापलेल्या मोठ्या आकारातील पानांची. शब्दास शब्द ठेवून पारंपरिक पद्धतीने अनुवाद करतो, म्हटले, तर मराठी पुस्तक सतरा-अठराशे पानांच्या वर जाईल. ते ओझे मराठी वाचकांस तर पेलवणार नाहीच; पण प्रकाशकास व अनुवादकासही सोसवणार नाही.

मग काय करायचे? कादंबरीची धीमी गती हा तर तिचा आत्मा. भारतीय समाजाची प्रचंड चक्रे जशी धीम्या गतीने फिरतात, तशी ही रमत-गमत जाणारी कादंबरी. तीमधील रस-वेल्हाळ पाल्हाळ काढून टाकला, तर कादंबरीचे स्वरूप बदलून टाकल्यासारखे होईल, प्रतारणा होईल, म्हणून तो तर असलाच पाहिजे. कादंबरी तिसऱ्या वेळी वाचताना मनाशी अनुवाद होत होता. त्या वेळी ही सहज संक्षेपाची शक्यता ध्यानी आली. त्याचबरोबर हेही लक्षात ठेवायला हवे, की मराठीतही अशा काही खुब्या असतात, की ज्या इंग्रजीत भाषांतर करताना एकास चार शब्द घालावे

लागतात. ती खुबी उलटी वापरली, तर इंग्रजीतून मराठीत आणताना शब्द कमी होतात. सोपे उदाहरण द्यायचे, तर 'डु यू फॉलो मी ?' किंवा 'यू फॉलो व्हॉट आय से ?' अशी इंग्रजीतील एक लकब. मराठीत 'मी काय म्हणतोय् ते तुला समजते आहे काय ?' असे कोणी म्हणत नाही. 'समजलास ?' एवढा एकच शब्द ही लकब दर्शवितो. आणखी एक उदाहरण, सहज संक्षेप होत असताना आशयाचा व लेखकाचा अधिक्षेप होत नाही ना, याची खातरजमा करून घेण्यासाठी. कादंबरीतील बहीण धाकटीच्या खोलीत येते. धाकटी वाचत बसलेली. पाश्चात्त्य शिष्टाचाराप्रमाणे म्हणा, की सुसंस्कृत वळणाने म्हणा, थोरली धाकटीला विचारते, 'मे आय सिट हियर ऑन द बेड ?' दोघी बहिणींचे स्वभाव, त्यांच्या घरचे वातावरण वगैरे माहीत झाल्यावर वरील प्रश्नाचे नुसते 'बसू अंथरुणावर ?' किंवा 'बसू ?' एवढे भाषांतर पुरे वाटते. 'इथे' किंवा 'तुझ्या अंथरुणावर' हे शब्द गाळल्याने अर्थाचा वा संदर्भाचा कोठलाही बारकावा निसटत नाही. अशा सहज संक्षेपात एका पानात सरासरीने दहा शब्द कमी झाले, तरी खूप काटकसर होईल.

काही ठिकाणी मात्र जाणीवपूर्वक संक्षेप केला, तोही वाचकांवर, लेखकावर व आशयावर अन्याय होणार नाही, याची काळजी घेऊन. उदाहरणार्थ : जस्टिस चॅटर्जी चिंतनमग्न असताना ते हायकोर्टाचे जुने अहवाल मुद्दाम चाळतात. तेव्हा त्यांच्या सखेद लक्षात येते, की स्वातंत्र्यानंतरच्या दोन वर्षांत न्यायमूर्तींच्या यादीतील किती तरी नावे कमी झाली आहेत. कमी झालेल्यांत बहुतेक गोरे व मुसलमान न्यायमूर्ती आहेत. गोरे मायदेशी परतले, मुसलमान पाकिस्तानात गेले. ते सारे चॅटर्जींचे मित्र होते, बुद्धिमान होते, विद्वान होते. चॅटर्जींना त्यांच्याबद्दल आदर होता. स्वातंत्र्यामुळे व फाळणीमुळे घडलेल्या अप्रिय गोष्टींपैकी ही देखील एक, याचे न्यायमूर्ती चॅटर्जींना विषादयुक्त भान येते. या चित्रणासाठी कादंबरीत लेखकाने हायकोर्टातील न्यायाधीशांची त्यांच्या पदव्यांसह पानभर तपशीलवार यादी दिली आहे. भाषांतरात फक्त तपशीलवार यादी गाळून, तिचा पूर्ण संदर्भ मात्र दिला. न्यायमूर्तींना वाटणारा विषाद वाचकांना पुरेपूर कळेल, ही दक्षता घेतली. तसेच, काही ठिकाणी लेखकाने गमतीखातर अवजड सरकारी नियम लांबलचक उद्धृत केले आहेत, उच्च गणिताचे प्रदीर्घ प्रस्ताव आहेत. भाषांतरात त्यांना फाटा दिला नाही. त्यातील गंमत मराठीतही उतरेल, अशा बेताने त्यांचा संक्षेप मात्र केला. त्यानेही आशयाला यत्किंचितही बाधा येऊ नये, याची काळजी घेतली. लांबी वाढू नये, या हेतूने कात्री लावली, ती फक्त एक-दोन ठिकाणी. म्हणजे - तसा मुलगा चांगला आहे हो, फक्त कधी कधी सिगारेट ओढतो, म्हणजे नेहमीच नव्हे, कधी मद्यपान केले, तर..... अशा तऱ्हेचे भारतभर सनातन काळापासून गुळगुळीत झालेले व हिंदी सिनेमातून अनेक वेळा वापरलेले किस्से बाजूला काढले, एवढेच. काहींची फक्त सूचना देऊन लांबी कमी केली. पाश्चात्त्य वाचकांना कदाचित हे किस्से गमतीशीर वाटतील. पण भारतीय वाचकांचा निश्चितच रसभंग होतो. विशेषतः, ज्या पात्रांच्या

तोंडी असे थिल्लर किस्से आले आहेत, त्यांच्या स्वभावात असा बाष्कळपणा बसत नाही, असेही वाटले, म्हणून थोडे स्वातंत्र्य घेऊन असे किस्से नुसते सूचित केले किंवा अगदी अनावश्यक तेथे कापून टाकले. यात लेखकावर किंवा वाचकावर अन्याय केला, असे मुळीच वाटत नाही. उलट, लेखकाच्या हितसंबधांचे योग्य रीतीने रक्षण केले, असे वाटते. भाषांतराच्या आचार-संहितेत किंवा शास्त्रात हे कितपत बसते, याची कल्पना नाही. परंतु शब्दास शब्द ठेवून भाषांतर करायचे नाही, हे तर आधीच ठरविले होते.

'सूटेबल बॉय' मराठीत आणताना खूप कष्ट घ्यावे लागले, ते या कादंबरीतील कवितांवर, धार्मिक वाङ्मयातील श्लोकांवर, कुराणातील सुरांवर, कादंबरीतील जे कवीचे पात्र आहे, त्याच्या कवितांवर, इतर कवींच्या कवितांवर, तसेच दोन-दोन ओळींच्या बडबड-गीतांवर. यांपैकी थोडासा सुलभ भाग हा कवितांचा होता. प्रस्तुत अनुवादकारास मुळात कविता-लेखनाची फारशी सवय नसल्याने थोडी अडचण आली खरी. खरे म्हणजे, मांडी घालून कोणी बसले, तर नादमधुर कविता करणे खूप अवघड असते, असे नव्हे. हातचा मळ नसला, तरी अशा कविता करता येतच नाहीत, असे नव्हे. उदाहरणार्थ, माध्यमिक शाळेत असताना रवींद्रनाथ टागोरांच्या गीतांजलीतील कित्येक कडव्यांचा शार्दूलविक्रीडित या वृत्तात अनुवाद केला होता. लेखाच्या सुरुवातीला दिलेल्या यादीत गीतांजलीही घालायला हवी. आता तो अनुवाद कोठे गेला, कोणास ठाऊक. परंतु शाळेत असताना प्रस्तुत लेखकाने लिहिलेली व सादर केलेली एक नाटिका व गीतांजलीचा हा अनुवाद, खरे म्हणजे, आमच्या लोकप्रिय शिक्षकांनीच केला असून, तो फक्त या मुलाच्या नावावर खपविला जात आहे, अशी जाहीर शंका त्यावेळी व्यक्त केली जात होती. तर असो. सांगण्याचा मुद्दा हा, की वेळ घेऊन बैठक मारली, तर अभिजात वृत्तांमध्ये किंवा छंदामध्ये काव्यानुवाद करणे कठीण नाही.

परंतु वेळेचा मुख्य प्रश्न होता. अनुवाद हे तसे सर्जनशील समजल्या जाणाऱ्या लेखकासाठी दुय्यम प्रतीचे काम समजले जाते. प्रस्तुत लेखक अनुवादात मग्न आहे हे बघून अनेक हितचिंतकांनी नाके मुरडली. (काहींनी उघड सल्लाही दिला) ते दोन कारणांसाठी. एक म्हणजे, याने स्वतःच्या कादंबऱ्या लिहिण्याचे सोडून भाषांतराचे उपद्व्याप करू नयेत. दुसरे, भाषांतर करायचे, ते विक्रम सेठचे? अर्थात अशा सल्ल्याने व नाके मुरडल्याने अनुवादक हतोत्साह झाला नाही, हे खरे. परंतु मनापासून करीत असलो, तरी अनुवाद हे दुय्यम प्रतीचे नसले, तरी आपल्या स्वतःच्या कादंबरी-लेखनाच्या संदर्भात प्राथम्याचे काम नव्हे, हे मात्र मनाशी होते. त्यामुळे ठरावीक कालावधीत अनुवाद पूर्ण करून स्वतःच्या कामासाठी मोकळे होण्याची योजना केली होती. भाषांतराच्या या वेगामध्ये कवितांसाठी बैठक मारली असती, तर आधीच उलटे-सुलटे झालेले वेळापत्रक फारच लांबले असते. मराठी लेखनावर आजच्या राहणीमानाच्या संदर्भात लेखक जगू शकत नाही, हे वाचकांनी लक्षात ठेवणे इष्ट होईल.

भाषांतरावर तर नाहीच नाही. सुखासीन नोकऱ्या करून फावल्या वेळात किंवा सुट्या काढून असे काम करणे हेच अपरिहार्य ठरते. एका परीने मराठी साहित्याची ही शोकांतिका होय. असो. वरील मुद्द्यात समर्थनाचा प्रयत्न नसून वस्तुस्थितीचे निदर्शन आहे. विक्रम सेठने कादंबरीसाठी आठ वर्षे दिली होती, हे लक्षात ठेवलेले बरे.

त्यामुळे कवितांचे बिनधास्त व बेधडक अनुवाद करीत गेलो. विक्रम सेठचे काम तसे स्वतःच्या ताब्यात होते. म्हणजे त्याने उर्दू गझला व शेर स्वतः निवडून, त्यांचा तयार अनुवाद घेतला किंवा स्वतः केला. कुराणातील सुरा निवडून, त्यांचा तयार अधिकृत अनुवाद स्वीकारला. तेच भगवद्गीतेचे. अनुवादकाराला एका परीने साध्या कवितांचे भाषांतर करणे सोपे, परंतु सेठने दिलेल्या इंग्रजी अनुवादावरून मूळ सुरा कोणती, हे तपासायचे, कुराणाची मराठी भाषांतराची अधिकृत प्रत मिळवायची व तेथून नेमकी ती सुरा शोधून काढायची, हे काम थोडे जिकिरीचेच झाले. पण ते काम जिद्दीने केले. भगवद्गीतेच्या श्लोकांचे भाषांतर स्वतः करण्याचे औद्धत्य न करता विनोबांच्या गीताईवर भिस्त ठेवली आणि उर्दू गझला मुक्तपणे स्वतःच अनुवादित केल्या. तसे करताना गझलांचा घाट अभ्यासण्याचा थोडा-फार प्रयत्न केला. घाईगर्दीत तो कितपत जमला आहे, हे आता वाचकच ठरवतील.

खरी गंमत आली, ती मात्र बडबड-गीतांमध्ये. एक लक्षात ठेवले पाहिजे, की कादंबरीतील बडबड-कवने ही आंग्लाळलेल्या चॅटर्जी घरातील सदस्यांनी केली आहेत. त्यात इंग्रजी भाषेची खुमारी आहे, तसेच, भारतीय वातावरणात कारकून, दुकानदार वगैरे लोक ज्या तऱ्हेची इंग्रजी वापरतात, त्या भाषेची मिश्कील टवाळी देखील आहे. त्याचप्रमाणे अधूनमधून त्यांमध्ये बंगाली संदर्भ आहेत. अशा वैशिष्ट्यपूर्ण बडबड-गीतांचाच अनुवाद करताना त्यांतील या विशिष्ट खुबी दुसऱ्या भाषेत नेणे शक्य नाही. असे वाटते, की भाषांतराची ही कळीची समस्या सर्वांनाच पडत असावी. ती उल्लंघणे कठीण आहे, त्यामुळे ज्या संदर्भात ही बडबड-गीते या कादंबरीत अवतरली, जो एकूण भावार्थ त्यांमधून अभिप्रेत होता. ते लक्षात ठेवून या गीतांचा मुक्त अनुवाद केला. त्यामध्ये थोडे मराठीपण आणले; पण एकूण आशयाशी प्रतारणा होणार नाही, याची काळजी घेतली. म्हणजे उदाहरणार्थ, कादंबरीतील मीनाक्षीचे उत्स्फूर्त बडबड-कवन असेः

'मॅरीवन-अॅन्ड व्हॉट्स् माय फेट?
एव्हरी मेहरा ऑन माय प्लेट'
त्याचा मराठीत अनुवाद झाला तो असाः
लग्न करा एकाशी
सारे मेहरा उशाशी

यात मूळ आशयाच्या फार दूर गेलो, असे वाटत नाही. फक्त मीनाक्षीने आणलेला 'प्लेट'चा संदर्भ मराठीत नीट लागणार नाही. हाच अनुवाद 'उशाशी' च्या ऐवजी 'शेजेशी' असा करता आला असता. पण त्या वेळी तरी तो शब्द शोभून दिसेल, असे वाटले नाही. त्यामुळे उशाशी हाच शब्द ठेवला. बडबड-गीतांची एक विशिष्ट संस्कृती असते. हा एक खेळ असतो. यमके जुळवीत सोप्या चुरचुरीत रचना करीत किंचित नर्मविनोदाने किंवा बाष्कळपणाने एकमेकांचीच सुसंस्कृत टिंगल-टवाळी करायची. अशी बडबड-कवने उत्स्फूर्तपणे रचलेली असतात. मराठीमध्ये अशा गीतांची संस्कृती नाही. त्यामुळे ती थिल्लर वाटण्याचा संभव आहे. पण ती मुळातच थिल्लर असतात, हे लक्षात ठेवायला हवे.

कवितांचे अनुवाद करताना एका ठिकाणी मात्र जाणीवपूर्वक कात्री लावली. वाङ्मय मंडळातील एका काव्यवाचनात विक्रम सेठने माखीजानी या कवीची छंदोबद्ध अशी चांगली तेरा कडवी दिलेली आहेत. या साऱ्या छंदोबद्ध कवितांचा अनुवाद करताना दमछाक झाली असती. वेळही गेला असता. म्हणून दोन-तीन कडवी देऊन त्या कशा प्रकारच्या कविता आहेत, हे फक्त निदर्शित केले. नाही तरी विक्रम सेठने माखीजानींच्या कवितांची टरच उडविली आहे.

काही कविता विक्रमनेच मुद्दाम ओबड-धोबड ठेवल्या आहेत. म्हणजेच उदाहरणार्थ, इशाक नावाच्या सारंगियाने आपल्या दुखऱ्या हातावर केलेली कविता. 'हे माझ्या वेदनादायी हातांनो' अशी या कवितेची सुरुवात आहे किंवा माखीजानीसारख्यांच्या कवितांमुळे बोअर होऊन तेथून पळ काढण्यासाठी कबीरने मैत्रिणीला विडंबन-काव्यात्मक चिठ्ठी पाठविली, तिची सुरुवात अशी :

'चल, सखे, झडकरी, करू या खोली खाली

म्हणू नकोस नको, मज झोप आली-

कादंबरीकाराने मुद्दाम अशा अफलातून कविता रचल्या आहेत. अशा कवितांना स्वतः कादंबरीकारच गालांतल्या गालांत हसतो आहे; आणि तरीही कवितेने समृद्ध केलेल्या त्या त्या व्यक्तिमत्त्वाबद्दल प्रेम व आदरही निर्माण करतो आहे.

अनुवाद करताना सगळ्यांत तीव्रपणे जाणवलेली त्रुटी, म्हणजे चांगल्या मराठी-मराठी, इंग्रजी- मराठी अशा शब्दकोशांची व समशब्द कोशाची. तसेच, निसर्गकोश, वनस्पतिकोश, पक्षिकोश अशा मूलभूत ग्रंथांची. योग्य छटा दर्शविण्यासाठी इंग्रजीतील मोठ्या पंडितांना देखील शब्दकोश चाळण्याची सवय असते. असा चांगला मराठी शब्दकोशच अस्तित्वात नाही. इंग्रजी-मराठी शब्दकोशांची पूर्वी कधी नव्हे एवढी मदत घेण्याचा प्रसंग आला. पण त्यांनीही निराशा केली. इंग्रजीत कुराणाचे, गीतेचे, उपनिषदांचे सुंदर, काव्यमय व अभिजात अनुवाद उपलब्ध आहेत. मराठीत फार कमी.

इंग्रजीत तुलसीदासांचे रामचरितमानस उपलब्ध आहे, तसेच, उर्दू शायर गालिब, मीनाई, मीर हेही. मराठीत नन्नाचा पाढा. हे सारे पुन्हा एकदा जाणवून मराठी भाषेबद्दल वाईट वाटले.

तेव्हा अशी ही अनुवादाची संक्षिप्त कहाणी. यामध्ये प्रस्तुत नियतकालिकाच्या संपादकांना जो आशय अभिप्रेत होता, तो उतरला, की नाही, याची कल्पना नाही. अनुवाद करताना व केल्यानंतर जे वाटले व ज्या समस्या आल्या, त्यांविषयी थोडक्यात वस्तुनिष्ठपणे लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

**४५ पत्रकार, वान्द्रे (पू.) मुंबई ४०० ०५१.**

○○○

## कानी पडलेला संवाद

कधी कधी तर त्या दोघी एकाच वेळी दोन वेगवेगळया विषयांवर बोलत असतात. एकदा मी पेनमध्ये शाई भरत होतो आणि त्या दोघी जिन्याकडे उभ्या राहून बोलत होत्या.

आज्ञी म्हणत होती,

''तर मी काय सांगत होते की, लोणकरांच्या घराच्या पूर्वेला असलेल्या जमिनीच्या पट्ट्यात माझ्या भावाचा अर्धा भाग होता. आणि ....''

कृष्णाबाई म्हणाल्या,

''हो ना. तर गुळाच्या पोळया लाटताना त्यावर अगदी हलक्या हातान पीठ सोडल तरच पोळया मऊ.....''

''हो ना. तसच करायला पाहिजे. तर ती जमीन इतकी सुपीक होती म्हणून सांगू की त्यात मोती पेरले असते तरी उगवले असते.....''

''हो ना. तर परवा मी कडबू केले होते, त्यांना आवडतात म्हणून, तर त्यात.....''

ते बोलणं ऐकताना शाई पेनमध्ये न जाता बाहेरच जायला लागली म्हणून मी पेनच बंद करून टाकल. अशा वेळी आजोबा आपल्या कपाळाला हात लावून बसतात किंवा बाहेर निघून जातात.

**प्रकाश नारायण संत, ''भेट'', तरूण भारत (बेळगाव) दिवाळी १९९२, समावेश : वनवास (संग्रह), मौज, मुंबई १९९४.**

# उच्च माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तके

द. ता. भोसले

भाषा ही मानवाला मिळालेली एक अलौकिक देणगी आहे, हे आता नव्याने सांगण्याची गरज नाही. त्यातही मातृभाषा ही व्यक्तीचा विकास, सामाजिक संघटन आणि एकोपा आणि सांस्कृतिक समृद्धी आणि संवर्धन यांसाठी सर्वांत अधिक उपयुक्त ठरणारी बाब आहे. एका मातृभाषेमुळे दोन व्यक्तींमध्ये आपुलकी, समाजातील अस्मिता आणि सांस्कृतिक जीवनाचे सातत्य राखता येते. किंबहुना मातृभाषा ही व्यक्ती, समाज आणि संस्कृतीच्या प्रगतीची, तिच्या जिवंतपणाची महत्त्वाची खूण असते, यात शंका नाही. मातृभाषेने एखाद्या समाजाला किंवा राष्ट्राला उदंड प्रेरक शक्ती दिलेली आहे. याची अनेक उदाहरणे सांगता येण्यासारखी आहेत.

असे असले, तरी स्वातंत्र्यपूर्व काळात आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळातही प्रेरक शक्ती असलेल्या या मातृभाषेची आपण तशी उपेक्षाच केलेली आहे. तिच्याविषयीचे प्रेम, तिच्या विकासाची आच अगदी विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या वेळेपासून कमी असलेली आपणांस दिसून येते. मातृभाषेऐवजी राज्यकर्त्यांच्या भाषेचा पदोपदी निरर्थक वापर करणे आणि त्यात आपली प्रतिष्ठा सामावली आहे, अशी खोटी समजूत करून घेणे हे तर शंभर वर्षांपासून चालत आलेले व्रत आहे, आजकाल तर ते वाढतच चाललेले आहे. मराठी भाषा आणि साहित्य यांच्या विकासाला अडसर उत्पन्न करणारी जी अनेक कारणे आहेत; त्यांतील हे एक महत्त्वाचे कारण म्हणावे लागेल. त्याबरोबरच इंग्रजी माध्यमाला मिळालेली अतिरेकी प्रतिष्ठा, चांगल्या नोकरीशी इंग्रजीचा जोडलेला संबंध, व्यवहारामध्ये पदोपदी मराठीला मिळणारी गौण वागणूक, आपल्या सामाजिक प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पना; शिक्षणाच्या सर्वच स्तरांवर आवश्यक असो वा नसो, इंग्रजीची केलेली सक्ती; प्रादेशिक अस्मितेचा होणारा त्रास, प्रसारमाध्यमांचा सातत्याने होणारा विपरीत मारा आणि उपजीविकेचे केवळ एक साधन म्हणून भाषेकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोण या सर्वांचा होणारा वाईट परिणाम म्हणजे मराठी भाषेचा खुंटलेला किंवा मंदगतीने होणारा विकास म्हणावा लागेल.

कोणत्याही भाषेचा विकास प्रामुख्याने चार गोष्टींवर अवलंबून असतो. त्या चार गोष्टी म्हणजे १) मातृभाषेविषयी शासनाचे असणारे धोरण, २) समाज व्यवहारात



अनुक्रमणिका

मातृभाषेला असणारा वाव किंवा स्थान, ३) सर्वसामान्य भाषकाला तिच्याविषयी वाटणारी ओढ आणि ४) त्या भाषेत असलेले सर्व प्रकारचे साहित्य आणि त्या साहित्याचा दर्जा! अगदी शाळा-महाविद्यालयांतून शिकविल्या जाणाऱ्या पाठ्यपुस्तकांचे स्वरूप आणि त्यांचाही दर्जा! या चार गोष्टी कोणत्याही भाषेच्या सर्वांगीण विकासाला मुख्यतः कारणीभूत असतात. यांतील पहिल्या तीन गोष्टींविषयी काय बोलावे ? आपल्या मराठीविषयीचे शासनाचे धोरण अगदीच उपेक्षेचे नसले, तरी फारसे मनःपूर्वक नाही असेच म्हणावे लागेल. शासकीय पत्रव्यवहारात मराठीचा केला जाणारा वापर; शाळा-महाविद्यालयांमध्ये मराठी भाषेचा होणारा वापर; तिच्या सर्वांगीण विकासासाठी योजनाबद्ध सुरू केलेले उपक्रम आणि त्या उपक्रमांची सौम्य निष्ठेने होणारी प्रत्यक्षातील कार्यवाही या गोष्टी मराठीच्या विकासाला पुरेशा पोषक म्हणता येणार नाहीत. शेजारची कर्नाटक आणि तामीळनाडू राज्ये आपल्या मातृभाषेविषयी जी पावले उचलतात, अन् प्रेम, आस्था, तडफ दाखवितात; तेवढी आपले महाराष्ट्राचे शासन दाखवीत आहे, असे वाटत नाही. द्वारकाप्रसाद मिश्र मध्यप्रदेशचे मुख्यमंत्री असताना शासनाचा सर्व पत्रव्यवहार हिंदी भाषेतून होईल, असे ठरवितात. मंत्रालयापासून जिल्हा पातळीपर्यंतच्या सर्व सनदी नोकरांना हिंदी शिकण्यासाठी व तिचा वापर करण्यासाठी विशिष्ट कालावधी देतात आणि तदनंतर इंग्रजीतून सहीसाठी आलेल्या कागपत्रावर ते स्पष्टपणे लिहितात की, 'मुझे अंग्रेजी आती नहीं! आपका खत हिंदी मे तैयार कर दो! अंग्रेजी पत्रोंपर मैं स्वाक्षरी नहीं करूंगा।'' अशी भूमिका आपले शासन आणि त्यातील सर्व मंत्री जेव्हा ठामपणे घेतील; तेव्हा कुठे मराठीला मोठा श्वास घेता येईल. सर्व पातळ्यांवर शासकीय पत्रव्यवहार मराठीतून; सर्व स्तरांवरील विद्यार्थ्यांसाठी सक्तीचे मराठी; मराठीच्या सर्वांगीण विकासासाठी उपयुक्त ठरणाऱ्या सर्व गोष्टींचा मनःपूर्वक पाठपुरावा आणि साहित्यविषयक आणि सांस्कृतिक उपक्रमांना भरघोस प्रोत्साहन या गोष्टी गांभीर्याने, निष्ठापूर्वक आणि दीर्घकाल केल्या, तर मराठीच्या सकस अभिवृद्धीस पोषक वातावरण तयार होऊ शकेल, असे वाटते.

समाजव्यवहारात मराठीला दिला जाणारा वाव हा सर्वसामान्य मराठी माणसाला मराठीविषयी वाटणाऱ्या आस्थेवर, अभिमानावर अवलंबून असतो. एखाद्या भाषेच्या विकासाचा खरा आधार हा सर्वसामान्य माणूसच असतो. तो घरात, मित्रांमध्ये कोणती भाषा वापरतो; आपल्या मुलांना कोणत्या माध्यमाच्या शाळेत घालतो; लग्नपत्रिकांपासून ते वृत्तपत्रांपर्यंत कोणत्या भाषेचा आधार घेतो, रोजच्या बोलण्यात इंग्रजी शब्द कटाक्षाने किती टाळतो, मराठी भाषा आणि साहित्य याविषयी विशेष आस्था, गती असलेल्या आपल्या मुलास मराठी हा विषय पदवीसाठी घेण्यासाठी किती प्रोत्साहन देतो; प्रसिद्ध झालेल्या चांगल्या साहित्याची खरेदी करून किती वाचतो; या खरेदीवर तो किती खर्च करतो, मराठीला उपयुक्त असलेल्या वाङ्मयीन आणि सांस्कृतिक उपक्रमांना किती हजर राहतो व त्यात किती सोत्साह भाग घेतो, आपल्या मातृभाषेत





अनुक्रमणिका

प्रसिद्ध झालेल्या नाटक, सिनेमासाठी किती वेळ आणि पैसा खर्च करतो, यासारख्या किती तरी गोष्टींवर मराठीचा विकास, तिचा जिवंतपणा अवलंबून असतो. या बाबतीत आपण सारे किती प्रामाणिक आहोत, हे ज्याचे त्याने पडताळून पाहिलेले चांगले. मराठी भाषा आणि साहित्य आणि त्या साहित्याचा दर्जा यांविषयी देखील तसे खूप सांगण्यासारखे असले, तरी प्रस्तुत निबंधामध्ये 'उच्च माध्यामिक स्तरावरील पाठ्यपुस्तके' मराठीच्या विकासाला कशी नि कितपत उपयुक्त होऊ शकतील, याचाच प्रामुख्याने विचार करावयाचे ठरविले आहे: तेही अगदी सूत्ररूपाने. म्हणून त्याकडे मी वळत नाही.

हा विचार करण्याआधी आपणां सर्वांना हे मान्य करायला हवे की, मराठी विषयाची पाठ्यपुस्तके ही मराठीच्या विकासाचा एका परीने पायाभरणी करणारा महत्त्वाचा नि मूलभूत घटक आहेत. पाठ्यपुस्तक हे कोणत्याही भाषेच्या प्रेमात पडायला कारणीभूत ठरणारा पहिला स्पर्श आहे. पाठ्यपुस्तक म्हणजे साहित्याच्या अक्षय आनंदवनात पडणारे पहिले पाऊल होय. प्राथमिक शाळेतील पाठ्यपुस्तके जशी बालकांच्या भावजीवनाचे भरण-पोषण करणारी सुवर्णपात्रे असतात; तशीच त्या भाषेला आधार देणाऱ्या नव्या, कोवळया अशा उपासकांची, वाचकांची निर्मिती करणारी खाण असतात. म्हणून कोणत्याही भाषेच्या विकासाचा पाया ही पाठ्यपुस्तकेच घालत असतात; असे म्हटले, तर अयोग्य ठरू नये. प्राथमिक शाळेतील पाठ्यपुस्तकांइतकेच महत्त्व माध्यमिक आणि उच्च माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तकांनाही असते. कारण या पाठ्यपुस्तकांचा प्रभाव, परिणाम, वाङ्मयीन संस्कार आणि त्याद्वारे त्यांना होणारा जीवनाचा साक्षात्कार हा आमूलाग्र स्वरूपाचा आणि दीर्घकाळ टिकणारा असतो.

अर्थात उच्च माध्यमिक स्तरांवरील पाठ्यपुस्तकाचे हे पायाभूत आणि मौलिक स्वरूपाचे कार्य पुन्हा तीन घटकांवर अवलंबून असते. ते तीन घटक म्हणजे १) पाठ्यपुस्तक शिकविणारा शिक्षक २) त्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या घरातील वातावरण आणि ३) तिसरा घटक म्हणजे विद्यार्थ्यांच्या हातात पडणारे पाठ्यपुस्तक : म्हणजेच विकासाचे पायाभूत कार्य करण्याचे त्याचे अंगभूत स्वरूप. हे तीनही घटक भाषेच्या अभिवृद्धीसाठी अतिशय महत्त्वाचे आहेत. अकरावी - बारावीला शिकणाऱ्या विद्यार्थ्याला मराठी विषयाचे पाठ्यपुस्तक कितीही चांगले असले, तरी शिकविणारा प्राध्यापक जर सुमार दर्जाचा असेल तर उपयोग होणार नाही. शिकविणारा प्राध्यापक उत्तम असला, तरी विद्यार्थ्यांच्या घरातील वातावरण जर मराठीला पोषक नसेल, तर ते पाठ्यपुस्तक उपयोगाचे ठरणार नाही. आणि पहिल्या दोन्ही गोष्टी अनुकूल असल्या, तरी विद्यार्थ्यांच्या हाती पडलेले पाठ्यपुस्तक साधारण दर्जाचे आणि मराठीविषयी अप्रीती निर्माण करणारे असेल, तर मराठीच्या विकासाचे पायाभूत कार्य चांगल्या प्रकारे होणार नाही. यांतील पहिल्या दोन घटकांच्या बाबतींत आपल्या हाती काहीच नाही; पण निदान मुलांच्या हाती पडणारे पाठ्यपुस्तक अधिकाधिक परिपूर्ण, अधिक चांगले

आणि साहित्याविषयी उदंड प्रेम निर्माण करणारे असणे आपल्या हाती आहे. त्यासाठी जाणीवपूर्वक संपादन करणे हे आपल्या हाती असते. या संपादनामध्ये आपण यश संपादन केले, तर अध्यापन करणारा अध्यापक आणि घरातील प्रतिकूल असणारे वातावरण हे दोन्ही अडसर दूर सारूनही विद्यार्थी मातृभाषेच्या उपासनेला प्रवृत्त झाल्याशिवाय राहणार नाही, असे वाटते. असे म्हणण्याचे कारण असे, की प्राथमिक आणि माध्यमिक स्तरांवरील पाठ्यपुस्तकांचा आस्वाद व आकलन स्वतंत्र स्वरूपात विद्यार्थ्यांना घेता येत नाही. त्यांचे बौद्धिक आकलन कमी पडते. वाङ्मयाभिरुची विकसित झालेली नसते. स्वतंत्रपणे ते साहित्यकृतीचा आणि त्यातील जीवनचित्रणाचा विचार करू शकत नाहीत. अंतर्मुख होऊन थोडे-फार त्यावर चिंतन करण्याची वृत्ती या वयात कमी असते आणि पाठ्यपुस्तकांच्या आधारे अवांतर वाचनाकडे त्याने वळावे, अशी आपली अपेक्षा नसते आणि तो विद्यार्थीही फारसा वळत नाही. त्याने पाठ्यपुस्तकात समाविष्ट केलेल्या लेखकाचे चांगले अन्य साहित्य वाचावे, यासाठी आपण पालकही फारसे लक्ष घालत नसतो. शिवाय अभिरुचीचा विकासच अशा प्रकारचा झालेला असतो, की साहस, धाडस, अद्‌भुतता, विनोद आणि मुत्सद्देगिरी यांवर आधारलेल्या साहित्याचेच या वयातील मुलांना जबरदस्त आकर्षण असते. म्हणून या वयात बालवाङ्मय, कुमार वाङ्मय, अरेबियन नाईटस्, सिंदबादच्या सफरी, पंचतंत्र आणि बिरबल बादशहाच्या चमकदार गोष्टी यांसारख्या साहित्याकडेच तो अधिक वळलेला असतो. अशी परिस्थिती इयत्ता अकरावी आणि बारावीला आलेल्या विद्यार्थ्यांची नसते. त्यांचे आकलन, भाषा सौंदर्याविषयीची जाण; लक्षणा-व्यंजना यांच्या पोटात दडलेला अर्थ जाणून घेण्याची क्षमता; त्यांची विकसित झालेली अभिरुची; जीवनविषयक जाणीव प्रगल्भ होत असताना त्यांना येणारे बाह्य जगातील नानाविध अनुभव; साहित्यातून भेटलेल्या माणसाविषयी त्याचे होणारे चिंतन; त्यांची अनुभवाचे विश्लेषण करण्याची क्षमता, भाषेविषयीची त्यांना असलेली जाण, इ. अनेक गोष्टींमुळे हे वय भाषाविकासास अधिक उपयुक्त ठरणारे असते. एवढेच नव्हे, तर काही विद्यार्थी या वयामध्येही स्वतंत्र स्वरूपाचे चांगले लेखन करू शकतात, हे आपण पाहत असतो. म्हणून या मुलांच्या हाती आपण देत असलेली पाठ्यपुस्तके अधिक काळजीपूर्वक अधिक दर्जेदार असणे अत्यंत आवश्यक असते, याविषयी कुणाचेच दुमत होण्याचे कारण नसावे.

असा दर्जा आजच्या आपल्या पाठ्यपुस्तकांना असतो का? या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर आपणांला देता येत नाही. आजची आपली पाठ्यपुस्तके भाषाविकास, वाङ्मयीन अभिरुची आणि मराठीविषयी प्रेम वाढविण्यास फारशी उपयुक्त ठरू शकत नाहीत. याची जाणीव आपणा सर्वांनाच असावी. याचे एक महत्त्वाचे कारण असे; की उच्च माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तके तयार करताना पडणारी बंधने. ही बंधने पुन्हा दोन प्रकारची आहेत. एक ती वाङ्मयीन किंवा

पुस्तकांचा आपण तयार केलेला साचा याची असतात. दुसरे म्हणजे, ती अवाङ्मयीन अशा गोष्टींतून तयार झालेली असतात. या दोन्ही बंधनांच्या जाळयात सापडलेले पाठ्यपुस्तक मराठीच्या सर्वांगीण अभ्युदयाला पायाभूत कार्य करण्यास फारसे उपयुक्त ठरू शकत नाही.

इयत्ता अकरावी, बारावी वर्गाचे पाठ्यपुस्तक संपादित करताना येणारा अनुभव असा, की अनेकदा राजकीय भूमिकेचा अप्रत्यक्ष येणारा दबाव; विशिष्ट राजकीय विचारसरणी; सत्ताधारी पक्षांची आराध्य दैवते; प्रत्येक प्रदेशाला द्यावे लागणारे प्रतिनिधित्व; पाठांची निवड करताना विविध जातीजमातींच्या लेखकांचा पात्रता नसताना करावा लागणारा समावेश, प्रसिद्धिलोलुप लेखकांचा स्वतःचा पाठ समाविष्ट होण्यासाठी होणारा आग्रह, विविध वाङ्मयीन प्रवाहांचे दर्शन होण्यासाठी संपादनाच्या वेळी ठेवावे लागणारे भान, एकूण लेखकांच्या संख्येत स्त्रियांची संख्या कमी असताना देखील संपादनात समतोल राखण्यासाठी सामान्य लेखिकेचा करावा लागणारा समावेश; आणि संपादक मंडळातील काहींचा विशिष्ट लेखक/कवींविषयीचा आग्रह ही आणि यांसारखी आणखी काही अवाङ्मयीन कारणे नकळत बंधने घालतात. त्यातून संपादनाला मर्यादा पडतात. त्याचा वाङ्मयीन दर्जा खालावतो. वर दिलेली ही सारी कारणे आहेत अवाङ्मयीन बंधने घालणारीः

या बंधनांबरोबरच NCRT ने आणि शिक्षणखात्याने घातलेली बंधनेही पाठ्यपुस्तकांच्या स्वरूपाला मर्यादा घालतात. उच्च माध्यमिक स्तरावरील संपादन तयार करताना या दोन्ही घटकांचा आग्रह असा असतो, की पाठ्यपुस्तकात सर्वधर्मसमभावाचे तत्त्व आलेले असावे. कोणत्याही एखाद्या जातीच्या वा धर्माच्या भावना दुखावतील, असा मजकूर किंवा एखादा शब्द देखील त्यात येता कामा नये; धर्मगुरू किंवा धर्मसंस्थापकांविषयी अनादर व्यक्त होणारा पाठ किंवा उतारा त्यात असता कामा नये. राष्ट्र, समाज, देश, इतिहास थोर विभूती यांविषयी विद्यार्थ्यांच्या मनात आदर आणि प्रेम उत्पन्न व्हावयास उपयुक्त ठरणारे उतारे घ्यावेत. निसर्गाविषयी, पर्यावरणाविषयी, विज्ञानाविषयी मुलांच्या मनात जाणीव जागृती उत्पन्न व्हावी; लोकशाहीची आधारभूत मूल्ये; सामाजिक बांधिलकीची भावना उत्पन्न करणारे पाठ समाविष्ट केलेले असावेत. मुलांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण करणारे आणि आदर्श संस्कारांची शिकवण देणारे उतारे असावेत. स्त्री-पुरुष समानता आणणारे, तसेच, अंधश्रद्धा नि निरर्थक परंपरा, रूढी, लोकभ्रम दूर करणारे पाठ असावेत. आपल्या स्वातंत्र्य-चळवळींचा आणि त्यातील थोर देशभक्तांच्या जीवनाचा परिचय विद्यार्थ्यांना व्हावा, अशीही अपेक्षा या दोन घटकांनी व्यक्त केलेली असते. आपल्या संस्कृतीविषयी प्रेम आणि इतर संस्कृतीचा परिचय व्हावा, अशी भूमिका संपादनाच्या वेळी घेतलेली असावी; या प्रकारच्या अनेक अपेक्षा शिक्षणखाते आणि NCRT ही संस्था व्यक्त करीत असते. नव्हे, या सूत्राच्या अनुरोधानेच पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी, अशी सूचना केलेली असते. ही सारी

बंधने आणि या साऱ्या अपेक्षा समोर ठेवून पाठ्यपुस्तकाची निर्मिती करताना त्या संपादनाला एखाद्या 'होल्डॉल' चा आकार प्राप्त होतो. अनेक विषय, अनेक सूचना आणि सगळ्या सगळ्या अपेक्षा साठ-पासष्ट पानांच्या संपादनात आणि पंधरा-वीस कवितांमध्ये फलद्रूप झाल्या पाहिजेत आणि तरीही मराठी भाषा, इतिहास, साहित्य यांची त्यास आवडही उत्पन्न झाली पाहिजे. त्यामुळे या साऱ्या कसोट्यांना उतरणारा चांगला कलात्मक उतारा मिळत नाही आणि कसोट्या पूर्ण करणारा उतारा मराठीचे प्रेम, साहित्याविषयी ओढ आणि भाषेविषयी जिव्हाळा उत्पन्न करू शकत नाही, असा हा गुंता आहे. म्हणून कोणतेही संपादन हे राजकीय सत्तेच्या तात्कालिक गरजांचे साधन म्हणून वापरले जाऊ नये किंवा सगळ्या चांगल्या गोष्टींची एकच खिचडी तयार करण्याचे एक उथळ व प्रचारकी साधन असू नये. या अशा संपादनातून सर्वधर्मसमभाव कितपत साधला जातो आणि परधर्मसहिष्णुता, राष्ट्रप्रेम, इतिहासाभिमान कितपत जोपासला जातो, याची खरोखरच परखडपणे एकदा तपासणी व्हायला हवी. याचा तोटा मात्र मराठीच्या भाषाप्रेमाला, मराठी साहित्याला आणि अभिरुचिहानीला नक्कीच होतो. या साऱ्या गोष्टींचे गाठोडे बांधणारे पाठ्यपुस्तक कोणत्याच गोष्टीचा खोलवर संस्कार करू शकत नाही, हे आपल्या लक्षात येत नाही. प्रत्येक वर्षाला व प्रत्येक पाठ्यपुस्तकात पळी पळीने धार्मिक सहिष्णुता मुलांना पाजण्याचा एकीकडे आपण अट्टहास करायचा आणि प्रत्येक धर्माचा प्रत्येक निवडणुकीत आपण आधार घ्यायचा व राजकीय स्वार्थासाठी धर्मांध वातावरण तयार करावयाचे, असा आपला कारभार चाललेला आहे. एकीकडे जात मोडण्याचा संदेश मुलांना द्यायचा आणि त्याच वेळी जातीचा आधार घेऊन राजकीय आणि आर्थिक विकास साधायचा, असा प्रकार सर्रास चाललेला आहे! ना मानवतावादी कृतिशील आचरण, ना भाषेच्या पायाभूत विकासाचा कार्यक्रम! आणि तरीही 'मराठी असे आमुची राजभाषा' ही आमची दुमदुमणारी घोषणा असते!

उच्च माध्यमिक स्तरावरील मराठीची पाठ्यपुस्तके मराठीच्या सर्वांगीण विकासाला आणि मराठीच्या प्रेमाला फारशी उपयुक्त ठरणारी अशी निर्माण करता येत नाहीत, हे आतापर्यंतच्या विवेचनावरून थोडे-फार लक्षात आले असावे. मग यावर काही उपाय करता येण्यासारखा आहे का ? या पाठ्यपुस्तकात काही बदल करता येण्यासारखा आहे का ? मराठीच्या विकासाला ती अधिक उपयुक्त बनविता येतील का ? होय. नक्की चांगल्या प्रकारे ती तयार करता येतील, असे त्यावर माझे उत्तर आहे. त्यासाठी दोन स्तरांवर आपणांला कार्य करावे लागेल. दोन स्तरांवर आपणाला बदल करावे लागतील. हे स्तर आणि हे बदल विस्तारभयास्तव एकेका वाक्यात, सूत्ररूपाने खालीलप्रमाणे असावेत.

१) मराठी ज्यांची मातृभाषा आहे, त्या विद्यार्थ्यासाठी आणि ज्यांची मातृभाषा नाही, त्यांच्यासाठी पाठ्यपुस्तकात बदल करावे लागतील. मराठी भाषेविषयी आस्था





अनुक्रमणिका

व अभिमान वाटण्यासाठी आजच्या पाठ्यपुस्तकाचे स्वरूप बदलून आजचे जीवन आणि वाङ्मयाविषयीचे प्रेम वाढीस लागेल, अशी भूमिका घेऊन पाठांची निवड केली पाहिजे.

२) संपादनात निवडलेला उतारा असा असावा, की त्या उताऱ्याने विद्यार्थ्याला उच्चतम कोटीचा वाङ्मयीन आनंद तर दिलेला असावाच; पण त्याची जीवनजाणीव आणि वाङ्मयीन अभिरुची प्रगल्भ होण्यास मदत झालेली असावी.

३) ज्या मराठी लेखक/कवीचा उतारा घेतलेला असेल, त्या लेखकाची मूळ साहित्यकृती विद्यार्थ्याने वाचण्यास प्रवृत्त व्हावे; नव्हे, त्या लेखकाच्या अन्य साहित्यकृतींविषयी त्या विद्यार्थ्याला ओढ वाटायला हवी, असा उतारा निवडावा लागेल.

४) मराठी भाषेला खास तिचे असे लालित्य, सौंदर्य, माधुर्य आणि सामर्थ्य आहे. तिचे सर्वांगांनी असणारे अपूर्वत्व विद्यार्थ्याला जाणवेल, असे उतारे निवडावे लागतील.

५) पाठ्यपुस्तकात घेतलेल्या उताऱ्यांतून वर्तमान समाजजीवनाचे अधिक भान प्राप्त व्हावे. त्या उताऱ्यातून त्याला आपल्या जीवनाचे, आपल्या समाजाचे निकोप दर्शन घडावे.

६) जात, पात, धर्म, प्रदेश, इ. चा विचार न करता मराठीतल्या सर्वोत्कृष्ट लेखकांच्या सर्वोत्कृष्ट कलाकृतींचा समावेश पाठ्यपुस्तकात झालेला असावा.

७) मराठीला एक समृद्ध व गौरवशाली परंपरा आहे. या परंपरेचा परिचय घडविणाऱ्या त्यातील थोर लेखकांचे उतारे या संपादनात असावेत.

८) ज्यामध्ये बोलीमधील ताज्या नि नव्या नव्या शब्दांचा सढळ वापर झालेला आहे; ज्यामध्ये इंग्रजी शब्दांना चपखल असे मराठी शब्द वापरले आहेत, ज्यामध्ये मराठीची विनिमयाची सक्षमता चांगल्या प्रकारे प्रकट झालेली आहे आणि तरीही त्यातील वाङ्मयीन गुणवत्ता कमी झालेली नाही; असे उतारे निवडण्यावर आपण भर दिलेला असावा.

९) मराठीतील वेगवेगळ्या जोरकस वाङ्मयीन प्रवाहांची आणि समृद्ध वाङ्मय-प्रकारांची विद्यार्थ्यांना ओळख होईल, असे उतारे निवडण्याकडे लक्ष द्यावे लागेल.

१०) मराठीविषयी गोडी उत्पन्न व्हावयाची असेल, तर किचकट, अनावश्यक आणि नंतरच्या व्यावसायिक जीवनात फारसा उपयोगी न पडणारा व्याकरण आणि अलंकारांचा अभ्यासक्रम पाठ्यपुस्तकातून कमी केलेला असावा.

११) आणि पाठ्यपुस्तकाच्या निर्मितीच्या स्तरांवरील अखेरचा उपाय म्हणजे ज्यांची मराठी ही मातृभाषा नाही अशा विद्यार्थ्यांना उच्च माध्यमिक स्तरांवर मराठी

अभ्यासण्यासाठी किंवा मराठी हा ऐच्छिक विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र पाठ्यपुस्तक असावे आणि त्याचे स्वरूप वाङ्मयाभिमुखी असावे. म्हणजे प्रथम वर्ष बी.ए.ला जाणाऱ्या विद्यार्थ्यांची पूर्वतयारी या संपादनाने होऊ शकेल, अन् तो दबकूनही जाणार नाही.

१२) कोणत्याही प्रकारचा आग्रह, कोणत्याही प्रकारचा दबाब; कोणत्याही प्रकारची व्यावहारिक भूमिका किंवा राजकीय अपेक्षा यांना बळी न पडता निखळ मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांच्या विकासाच्या प्रामाणिक तळमळीतून पाठ्यपुस्तकांचे संपादन व्हावे. त्याला वाङ्मयीन गुणवत्ता अधिक कशी लाभेल, एवढीच भूमिका समोर ठेवलेली असावी.

पाठ्यपुस्तक निर्मितीच्या स्तरावर या गोष्टींचा आग्रह धरीत असताना किंवा हे बदल करीत असतानाच आणखी एका स्तरावर आपणांला मराठीच्या विकासासाठी कार्य करावे लागेल. त्याचे स्वरूप खालीलप्रमाणे सांगता येईल.

१) ज्या अध्यापकाचा बी.ए. आणि एम.ए. च्या पदवीपरीक्षेला मराठी हा स्पेशल विषय नसेल; त्याला मराठीचे अध्यापन न देण्याविषयीचा आग्रह सर्व पातळयांवर आपणांला घ्यावा लागेल. आज माध्यमिक स्तरावर मराठीचे अध्यापन अगदी इतिहास, अर्थशास्त्र आणि शारीरिक शिक्षणाची पदवी घेतलेल्या शिक्षकांना को[illegible]ास भाग पाडले जाते. नव्हे, सोय म्हणून सांगितले जाते. ते बंद व्हावयास हवे.

२) मराठी हा विषय पदव्युत्तर पातळीपर्यंत असला, तरी अशाही अध्यापकांचे अध्यापन कौशल्य वाढण्यासाठी आणि मराठीविषयी मुलांना प्रेम वाटण्यासाठी सातत्याने उद्बोधन झाले पाहिजे. मराठी पाठाविषयी रुची कशी वाढेल, यावर उद्बोधन वर्गात भर दिला पाहिजे.

३) प्रशासकीय नोकऱ्यांमध्ये मराठी घेतलेल्या उमेदवारांना अग्रक्रम दिला जावा, यासाठी शासनाकडे आग्रह धरला पाहिजे. तसेच, प्रशासकीय कारभाराची भाषा सर्व स्तरांवर मराठी कशी वापरली जाईल, याकडे लक्ष द्यावे लागेल.

४) इंग्रजी शब्दाला सहज, प्रासादिक आणि अर्थपूर्ण मराठी प्रतिशब्द तयार करण्यावर आपण भर देऊन त्यांच्या वापराचा आपण आग्रह धरला पाहिजे म्हणजे मराठी ही 'कम्युनिकेशन Language' म्हणूनही कशी कमी नाही, हे समाजाला कळू शकेल.

५) पाठ्यपुस्तकांचा अभ्यास संपवून ज्यांना मराठीविषयी प्रेम आहे, अशा पुढे न शिकणाऱ्या ग्रामीण तरुण सुशिक्षितांना त्यांचे मराठी प्रेम वाढीस लागण्यासाठी प्रत्येक गावी ग्रंथालय स्थापण्याचा शासनाकडे आग्रह धरला पाहिजे. त्यासाठी भरघोस देणगी अनुदान देण्यासाठी आग्रह धरला, म्हणजे या तरुणाचे मराठीप्रेम

खंडित होणार नाही.

६) मराठी साहित्य आणि संस्कृतीचे समृद्ध दर्शन घडविणाऱ्या सांस्कृतिक उपक्रमांचे गावपातळीपर्यंत जाळे निर्माण करता आले पाहिजे. त्यासाठी योजनापूर्वक कार्यक्रम आखावे लागतील.

७) मराठी भाषा आणि साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी स्थानिक पातळीवरील मराठीप्रेमी मंडळीचा मराठीच्या विकासासाठी जाणीवपूर्वक वापर करण्याची एखादी योजना राबविली पाहिजे.

८) जो शासकीय अधिकारी मराठीचा व्यवहारात, पत्रलेखनात, निवेदनात वापर करण्यात कुचराई करील, त्याच्यावर कारवाई करण्याविषयीचा आग्रह शासनाकडे धरावा लागेल.

याशिवाय आणखी किती तरी गोष्टी आपणांला कराव्या लागतील. पाठ्यपुस्तक निर्मितीच्या पातळीवर, प्रशासकीय पातळीवर आणि सामाजिक व्यवहाराच्या पातळीवर करता येण्यासारखे हे काही बदल येथे नमूद केले आहेत, इतकेच. या सर्वांची कार्यवाही शासन, मराठीप्रेमी मंडळी आणि मराठीला शक्ती देणाऱ्या प्रकाशनसंस्था वृत्तपत्रे, प्रसारमाध्यमे यांसारख्या संस्था किती निष्ठेने, किती गांभीर्याने व किती तळमळीने करणार आहेत, यावरच मराठीचा भविष्यकाळ उज्ज्वल, की अंधारमय होणार, हे अवलंबून राहणार आहे.

मर्यादित वेळ आणि मर्यादित शब्दसंख्या यांचे बंधन पाळावे लागल्यामुळे या निबंधात आणखी काही गोष्टींचा ऊहापोह करता येण्यासारखा असूनही तो केलेला नाही, याची जाणीव आपणांप्रमाणे मलाही आहे, एवढेच मी अखेरीला नमूद करतो.

**पंढरपूर कॉलेज, पंढरपूर**

○○○

# बोलू, तैसे लिहू

नीलिमा गुंडी

मुलगी लिहायला शिकल्यापासून मला 'बोले तैसा चाले, त्याची वंदावी पावले' या उक्तीची सारखी आठवण येऊ लागली आहे. कारण नव्याने अक्षरलेखन शिकलेली ती चिमुरडी 'बोलू, तैसे लिहू' अशा पवित्र्याने लेखन करायला समोर बसते.

अक्षरओळख होताना उच्चारांवर लक्ष केंद्रित करायला मीच तिला शिकवले. श. ष, हे वेगळे उच्चार, रु आणि ऋ तील फरक, ऱ्हस्व व दीर्घ उच्चारांतील फरक लहानपणीच कळावेत, हा त्यामागचा हेतू होता. त्यामुळे शिशुशाळेत असताना घरी 'शाळा शाळा' खेळताना ती खोट्या खोट्या मुलांना शिकवी ''लिहा, आ ई - दुसरी. आ जी - दुसरी'' 'हा काय प्रकार आहे ?', असे विचारता, तिचे म्हणणे पडले, की वेलांटी कोणती, ते लक्षात ठेवायला सोपे जावे, म्हणून ती तसे करीत आहे!

उच्चाराशी प्रामाणिक राहण्याचा हा स्वभाव पुढे मला महाग पडू लागला. कारण उच्चार आणि लेखन यांतली विसंगती तिला सतावू लागली. 'अ' बाराखडीत 'अं' चा 'अम्' असा एकच उच्चार होत असताना सिंह, अंगाई अशा शब्दांत अनुस्वाराचे विविध उच्चार तिला मान्य होईनात!

'सर्कस' आणि 'कसरत' या दोन शब्दांमधे उच्चारांत साम्य आणि लिहिताना वेगळेपण, हे तिला खटके. 'स्वैपाक' म्हणायचं आणि लिहिताना 'स्वयंपाक' लिहायचं; हे असं का ? तिच्या दृष्टीने मी चुकीचे बोलते तरी किंवा शिकवते तरी!

पहिलीत असताना तिला एकदा 'लेझिम' शब्द लिहायला घातला, तर मला ती विचारते, ''लेझिम 'बालभारती' तलं, की 'परिसरात' तलं ?'' कारण एका पुस्तकात तो शब्द ऱ्हस्व लिहिला आहे आणि दुसऱ्यात तो दीर्घ लिहिला आहे!.... एकूण विसंगती वाढतच होत्या..

पुढे गणितात पाढे लिहायची वेळ आल्यावरही असेच! लिहायचे १०८ आणि म्हणायचे अष्टोदरसे!

त्यामुळे लहानपणी तिचे लेखन चालू असताना चेहऱ्यावर असे भाव असत : काय

हे ! बोलायचं एक नि लिहायचं दुसरंच! आणि आई, हे तूच शिकवतेस ना?

–आणि मग मलाही वाटू लागे, खरंच! पुढे व्यवहारात अनेक विसंगती पचवाव्या लागतातच! त्याचे बाळकडूच आपण तिला भाषेतून देत आहोत, की काय?

**'अन्नपूर्णा', सुभाषनगर, ५ वी गल्ली पुणे, ४११००२**

○○○

**सूचनाफलक**

# क्षमाप्रार्थना

भाषाआणि जीवन च्या १२:३ पावसाळा १९९५ या अंकात दखलपात्र या सदरात माननीय स.ह.देशपांडे आणि मंगला गोडबोले यांच्या मूळ मौजेच्या १९९४ च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेल्या 'पुलं चं वक्तृत्व' या लेखातील काही मजकूर ''भाषण' आणि 'व्याख्यान'' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झालेला आहे. हा मजकूर अत्यंत अशुद्ध स्वरुपात छापला गेला असून त्यात पन्नासच्यावर मुद्रणाच्या चुका आहेत. त्यामुळे या लेखकद्वयांना मनस्ताप होणे स्वाभाविक आहे. मराठी भाषेच्या शुद्ध वापराचा आग्रह धरणाऱ्या भाषा आणि जीवन मध्ये अशा पद्धतीने मजकूर छापला जावा ही गोष्ट अपेक्षाभंग करणारी असल्याने इतरही अनेक वाचकांना सखेद आश्चर्य वाटणे साहजिक आहे. तशी नाराजी व्यक्त करणारी पत्रंही आमच्याकडे आली आहेत. आम्हांलाही या प्रकाराबद्दल मनस्तापपूर्वक खेद वाटलेला आहे. नजर चुकीने घडलेल्या या प्रकाराबद्दल आमची संपादकीय जबाबदारी स्वीकारून आम्ही लेखकद्वयाची आणि सर्व वाचकांची क्षमा मागतो. यापुढे या प्रकाराची पुनरावृत्ती होणार नाही, याची दक्षता घेतली जाईल. सर्वांनी भाषा आणि जीवन वरील लोभ कायम ठेवावा ही विनंती.

**संपादक**

**साद आणि प्रतिसाद**

# मराठीतील लांबलचक वाक्ये

**मनोहर राईलकर**

'सल' ह्या माझ्या लेखाची दखल ('भाषा आणि जीवन'चा उन्हाळा १९९४ चा अंक) श्रीमती गौरी देशपांडे यांच्यासारख्या विदुषींना घ्यावीशी वाटली, याचा आनंद वाटला. माझ्याशी त्या बहुतांश सहमत आहेत, हे वाचून समाधानही झाले. माझ्या लेखातला एक मुद्दा त्यांना मान्य नाही. तेवढ्यापुरता ह्या प्रतिसादाचा प्रपंच.

लांबलचक वाक्ये मराठीला झेपतात, की नाही, हा त्यांच्या मतभेदाचा मुद्दा होऊ शकेल. लांबलचक वाक्ये मराठीला झेपत नाहीत, हे माझे म्हणणे अमान्य करताना त्यांनी माझ्या लेखातलेच एक वाक्य मराठी वळणाने लिहून दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे कौशल्य आणि मराठीवरील प्रभुत्व निर्विवाद आहे. पण ते वाक्य तयार करताना त्यांना किती कष्ट पडले असतील, ते त्यांचे त्यांनाच माहीत. असा माझा समज होण्याचे कारण, यातही सुधारणा शक्य आहेत, असे त्यांनी मान्य केले आहे. मात्र, माझा मुद्दा खोडून काढण्याकरताच त्यांनी ते कष्ट घेतले असावेत, असे मला वाटते. असो. पण श्रीमती देशपांडे यांनी उपस्थित केलेल्या एका मुद्द्याचा परामर्श घेणे जरुरीचे वाटते.

पंधरा ओळींच्या वाक्याचे पंधरा तुकडे करावेत, की आणखी, हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. पण आपले म्हणणे वाचकांना (किंवा भाषणाच्या वेळी श्रोत्यांना) कळावे, हा आपल्या लेखनाचा (आणि भाषणाचा) मुख्य हेतू असावा. तो तर अमान्य होण्याचे कारण नाही?

मी भाषाशास्त्राचा तज्ज्ञ नव्हे. माझा विषय गणित. तो तर मुळातच अतिकठीण मानला गेलेला विषय. दिलेल्या माहितीमधले गणित नेमके कळण्यात भाषेचा अडसर होतो, हे मी कित्येकदा अनुभवले आहे. आणि विद्यार्थ्यांना केवळ भाषाच कळली नाही, म्हणून उदाहरण कळले नाही, आणि त्याच कारणामुळे ते सोडवता आले नाही, हेही अनुभवले आहे. लांबलचक वाक्ये हा इतरत्र गुण आहे, की नाही, ते मला माहीत नाही. पण विज्ञान विषयात तरी तो एक मोठा अवगुण आणि परिणामी अकारण अडथळाच ठरतो, हा आमचा नेहमीचा अनुभव आहे. गणितात व्याख्या देता येणे हे एक आवश्यक अंग मानले जाते. पण व्याख्या एकाच वाक्यात दिली पाहिजे, हा आग्रह मूळ विषयाला मारक ठरतो. कारण त्या आग्रहामुळे मुले व्याख्येचा आशय समजून घेण्याऐवजी ती





अनुक्रमणिका

घोकून पाठ करण्याचा प्रयत्न करतात, असे लक्षात आले. म्हणून व्याख्येतील मूळ आशय अचूकपणे व्यक्त होईल, अशा अनेक सोप्या वाक्यांचा उपयोग करून, मी व्याख्या देण्याची पद्धत सुरू केली. आशयाला जेवढे महत्त्व आहे, तेवढे विशिष्ट शब्दयोजनेला नाही.

'सोपे आणि सुटसुटीत' यांचा उदो उदो करण्यापायी लेखक आणि वाचक दोघेही आळशी होत जातात, हे त्या कशाच्या आधारावर म्हणतात, ते मला कळले नाही. १९४५ सालची गोष्ट. बाणभट्टाच्या कादंबरीतील एक उतारा आम्हांला मॅट्रिकच्या संस्कृत विषयाकरता होता. त्यातील एक वाक्य, संधी आणि समास मिळून सलग तेरा ओळींचे होते. तसे वाक्य बनवताना बाणाला किती कष्ट पडले, अथवा किती सोपे गेले, ते मला सांगता यायचे नाही; पण त्याचा अन्वय आणि अर्थ आम्हांला समजावून सांगताना आमच्या गुरुजींची चांगलीच दमछाक व्हायची, हे मला अजूनही स्मरते. आणि शाब्दिक कसरतीच्या पलीकडे बाणभट्टाने त्यात काही साधले असावे, असे मला अजूनही वाटत नाही. कदाचित, भाषेमध्ये ह्या प्रकारच्या कसरतींनाही स्थान असू शकेल. त्याबद्दल बोलण्याचा मला अधिकार नाही. नाही तरी सुभाषितरत्नभांडारम् ह्या संग्रहात चित्रकाव्य नावाचे वेगळे प्रकरणही आहेच की.

सोपे आणि सुटसुटीत लेखन करण्यामुळे वाचक आळशी होतात, की नाही, हे मला माहीत नाही. पण सोपे करून सांगणे सोपे नसते. उलट, जास्तच अवघड असते, याची मला चांगलीच जाणीव आहे. त्यामुळे लेखक तर नक्कीच आळशी होणार नाहीत. आपला विषय समोरच्यांना जास्तीत जास्त सोपा करून सांगण्याकरता लेखकाला खूपच कष्ट घ्यावे लागतात, हे एक; आणि आपल्याच विषयाची आतापर्यंत कदाचित, न उमगलेली अंगे दृष्टोत्पत्तीस येऊ लागतात, हे दुसरे. ज्यांना मी विषय समजावून सांगतो आहे, त्यांना माझा विषय कळलाच पाहिजे, असे मला वाटते. आणि माझा विषय माझ्या वाचकांना / श्रोत्यांना कळलाच पाहिजे, हा माझा आग्रह अनाठायी आहे काय? नाही तर मी लिहू तरी कशाला आणि बोलू तरी कशाला? आपला विषय ज्यांना सांगायचा आहे, त्यांना तो सहज कळावा, यासाठी कुणी भाषा सोपी केली, तर त्याला मी तरी उत्तेजनच देईन. त्यात खेद करण्यासारखे काय आहे? उलट, ती समाधानाचीच बाब आहे. 'सोपे आणि सुटसुटीत' करण्याला आजच्या धावपळीच्या वृत्तपत्रीय जीवनात वेळ नसल्यामुळेच तर भाषा अशी विकृत होऊ लागली आहे. पण इतरत्र तरी असा प्रयत्न केलाच पाहिजे.

श्रीमती देशपांडे यांनी डॉ. जॉन्सन यांच्या लेखनाचा उल्लेख करून आणखी एक मुद्दा उपस्थित केला आहे. मला त्याची काहीच माहिती नाही. पण इंग्रजी (फारसे अथवा चांगले) न जाणणाऱ्या मराठी वाचकांपर्यंत त्यांचे म्हणणे नेमकेपणाने पोहोचवणे हाच तर भाषांतरकर्त्याचा उद्देश असणार ना? मग त्यांच्या वाक्यातील मुद्दे वेगवेगळे करून सोप्या मराठीत मांडणे हेच भांषातरकर्त्याचे कर्तव्य ठरते, असे नाही का वाटत? तेथे

शैलीचा आब राखण्याची बाब गौण आहे. खरे तर, मूळ लेखनशैलीचा अनुभव भाषांतरामार्फत घेणे जवळ जवळ अशक्य आहे. कारण दोन भाषांच्या प्रकृतीच भिन्न असतात. हे श्रीमती देशपांडे यांनाही अमान्य होणार नाही.

**गजांजली, ४६, वाळवेकर एस्टेट, पुणे ४११००९**

# ग्राम्यतेतील सामर्थ्य?

**यशवंत कानिटकर**

'ग्राम्यतेतील सामर्थ्य' हा श्री. श्रीपाद जोशी यांचा लेख 'भाषा आणि जीवन' या नियतकालिकाच्या पावसाळा, १९९३ या अंकात प्रसिद्ध झाला आहे. या लेखात त्यांनी माणसाच्या कामजीवनाशी संबंधित असलेल्या ग्राम्य शब्दांचा व म्हणींचा मुक्तपणे वापर केला आहे. हाच लेख याच विषयावरील एखाद्या चर्चासत्रात त्यांनी वाचला असता का, असा प्रश्न मनात उभा राहतो. भाषेतील काही शब्द अपशब्द, अश्लील शब्द, अशिष्ट वा ग्राम्य शब्द का ठरत असावेत? असे शब्द हे प्रायः माणसाच्या लैंगिक व्यवहाराशी वा मलमूत्रोत्सर्गादी व्यवहाराशी संबंधित असतात. या व्यवहाराभोवती एक प्रकारच्या चोरटेपणाचे कडे असते. हे व्यवहार एकान्तात व लोकांच्या नजरेआड करावयाचे असतात. म्हणून त्या क्रियांशी संबद्ध शब्द चारचौघांत न उच्चारण्याजोगे अर्थात अवाच्य ठरत असावेत, की काय? श्री. जोशी यांना अभिप्रेत असलेले 'सामर्थ्य' या अवाच्यतेत तर दडलेल नसावे? त्याची वाच्यता करणारी व्यक्ती एक प्रकारचा शिष्टसंमत संकेत मोडते. एक प्रकारचा कायदेभंग करते. ज्या गोष्टी करणे वा बोलणे शिष्टसंमत सामाजिक संकेताविरूद्ध आहे, त्या करण्यात करणाऱ्याला एक प्रकारचे रूढिभंजन वा बंडखोरीचे समाधान मिळत असावे व लोकमानसावर होणारा त्याचा बरा-वाईट परिणाम हे त्याचे सामर्थ्य म्हणावे लागेल.

ही गोष्ट खरी, की लैंगिक व्यवहाराविषयीचे शब्द, वाक्प्रचार म्हणी यांबद्दलचे आकर्षण वा ओढ तशी सार्वत्रिक म्हणता येईल. या संबधीच्या किश्शांना 'नॉनव्हेज जोक्स' असे म्हणण्याचा परिपाठही पडला आहे. मात्र त्यांचा वापर समलिंगी गटातच होताना दिसतो. स्त्रीपुरुषांच्या संमिश्र समाजात हे किस्से सांगण्याचे धाष्टर्य करणारे विरळा. श्री. जोशी यांनी दिलेला संवादही बायकाबायकांतलाच आहे.

कामजीवनाशी संबंधित शब्दांसाठी काही सांकेतिक पर्याय योजून ते वापरण्याचा प्रघातही कथाकादंबऱ्यातून व संभाषणातूनही दिसतो. 'बॉल' हे याचे ठळक उदाहरण. कामजीवनाचे उघडेवाघडे चित्रण करण्यासाठी प्रसिद्ध असलेल्या डी. एच्. लॅरेन्स याने आपल्या 'लेडी चॅटर्लीज लव्हर' या गाजलेल्या कादंबरीत पुरुषाच्या जननेंद्रियासाठी मि. जॉन हा शब्द वापरल्याचे आठवते. कॉक या इंग्रजी शब्दाचा अर्थही असाच होत

असल्यामुळे व सामान्य व्यवहारात कॉकऐवजी 'रूस्टर' हा शब्द प्रयोग होत असल्याची नोंदही एका सोशयो लिंग्विस्टिक्स च्या पुस्तकात पाहावयास मिळाली. टाबू वर्डस वा निषिद्ध शब्द सर्व भाषांत व समाजांत आहेत. मलमूत्रोत्सर्गाच्या शारीरिक क्रियेसाठी मराठीत असलेल्या शब्दांची व त्यात वेळोवेळी होत असलेल्या बदलांची मनोमन उजळणी केली, तरी याचा प्रत्यय आल्याशिवाय राहणार नाही. म्हणून या व्यवहाराशी संबंधित पर्यायी सांकेतिक शब्द किंवा अरूढ व अभिजात भाषांत वापरले जाणारे शब्द योजले जात असावेत. स्तन, उरोज, नितंब हे शब्द शिष्टसंमत ठरतात; पण थान, ढुंगण हे शब्द अशिष्ट व ग्राम्य ठरतात. 'उपस्थ', 'योनी', 'वृषण' हे शब्द वैज्ञानिक साहित्यात वापरले जातात; पण त्यांचे रूढ पर्याय ग्राम्य ठरतात. एका भाषेतील अश्लील वा ग्राम्य शब्दाशी ध्वनिसाम्य असलेले शब्द दुसऱ्या भाषेत तसे ठरत नाहीत. दोन्ही भाषांचा परस्पर संपर्क वाढलेला असेल, तर असे शब्द वापरण्याचे प्रमाण खूप कमी होते. दोन्ही भाषा जाणणारा माणूस अशा शब्दांचा वापर टाळतो. परिणामी असे शब्द भाषेतून बहिष्कृत होतात.

श्लील-अश्लीलतेच्या कल्पनाही कालमानाप्रमाणे बदलत असाव्यात. स्त्रीपुरुषांचा संमिश्र वावर अनेक क्षेत्रांत वाढलेला असल्यामुळे अशा शब्दांना वा वाक्प्रयोगांना पायबंद बसणे स्वाभाविक आहे. ग्रामीण जीवनाचा अनुभव असणारांना सर्व स्तरांवर तेथे अपशब्दाचा सर्रास वापर होत असल्याचे माहीत आहे. सुमारे १५० वर्षांपूर्वी मोल्सवर्थने आपल्या कोशाच्या प्रस्तावनेत याबाबत केलेली टीकाटिप्पणी पाहण्यासारखी आहे. तो लिहितो :

(XVIII-9) "The Insertion in the Dictionary of obscene words may need explanation :

They are not obscene in the view and sentiment of the Maratha people; They are ever in the mouths of the softest and most refined speakers. Some few indeed there are which are, even by the Marathas themselves, regarded as obscene; for the inserliou of these we urge the exceeding currency of them among the vulgar mass; and the necessity thence arising of explaining them and proscribing them, to the Marathi student. We further refer to the observations under the word गांड. still are there in the vulgar tongue many obscene words, especially with the initial letters च and फ, .which we have rejected utterly.

गांड या शब्दाच्या पोटात पुढील टीप आढळतेः Phrases in use-in use with the Vulgar and the polished, with the illiterate and the learned, with males and females, with man of hoary head and the yet lisping child, and in ordinary, familiar, accepted, and most approved use-amount in hundreds. They are heard in the Market and on the road, in the field and in the house, in the discussion of matters of sober

business and in angry altercations or fightings. They torm an important constituent of many causes and cases which ultimately appear in the Halls of collector and in the courts of the Judge. This reason of inserting them –and this has been our reason for inserting others of the gross and coarse phrases and terms of the nation's vocabulary has however been deemed insufficient and all but the above few are omitted. his observation and this notice apply also in the compound occurring below.

मराठी समाजात ग्राम्य शब्द, वाक्प्रयोग, म्हणी, इत्यादी आबालवृद्ध स्त्रीपुरुष, शिक्षित-अशिक्षित अशा सर्व स्तरांत सर्रास वापरले जाण्याची पूर्वापार परंपरा आहे, असे यावरून दिसते. रस्त्यात, शेतात, बाजारात, कोर्टकचेऱ्यांत, दिवाणखान्यात, संभाषणात, चर्चा करताना, भांडताना सर्वत्र व सर्वतोमुखी या ग्राम्य शब्दांचा बिनदिक्कत वापर त्या काळात होत होता, हे उघड दिसते. मराठी समाजही काही शब्द अश्लील मानतो, असा खुलासाही त्याने केला आहे. या सदरात पडणाऱ्या काही शब्दांच्या समावेशाचे या प्रमाणे समर्थन करून बव्हंशी शब्द वगळल्याचे तो नमूद करतो.

मोल्सवर्थनंतरच्या कोशकर्त्यांची विशेषत: दातेकर्वे यांच्या महाराष्ट्र शब्दकोशाची या संदर्भात काय भूमिका होती, याचा शोध कोशाच्या प्रस्तावनेवरून लागत नाही. मोल्सवर्थच्या कोशातील शब्दांव्यतिरक्त फारसे शब्द त्यात आले आहेत, असे वाटत नाही. कोशात अर्थात कुठल्याही शब्दाला मज्जाव नसावा. मराठी समाजमनाचा, नाते संबंधांचा, नीतिविषयक कल्पनांचा, जातीजमातींमधील ताणतणावांचा एकूणच सामाजिक जीवनाचा अशा भाषिक अंगाने अभ्यास करण्यासारखा आहे. या दृष्टीने ग्राम्य व अश्लील शब्द, वाक्प्रचार, म्हणी, शिमग्यातील उखाणे, लावण्या, इत्यादींचे संकलन उपयुक्त ठरेल, असे वाटते.

भाषिक अभ्यासाच्या दृष्टीने त्यांची उपयुक्तता निर्विवाद असली, तरी नित्य व्यवहारातील त्यांच्या वापराला सुसंस्कृत समाजाची मान्यता मिळणे अशक्यप्राय आहे. प्रत्येक समाजाची काही मूल्ये, काही श्रद्धा असतात. समाजमानसात निषिद्ध म्हणून नोंदल्या गेलेल्या शब्दांचा उघडउघड वापर या चौकटीत बसत नाही. काही असाधारण प्रसंगी मानसिक प्रक्षोभ अनावर झाल्यास शिव्यागाळीच्या स्वरूपात किंवा क्वचित इतर प्रसंगी असा निषिद्ध शब्दांचा वापर होताना दिसतो व त्यामुळेच त्याला काही सामर्थ्य प्राप्त होते. विधिनिषेधकल्पना ही एक सामाजिक व त्यामुळे भाषिक वस्तुस्थिती आहे. काही शब्द जात्याच अश्लील व निषिद्ध असल्याचे समाज मानत असल्यामुळे त्यांना समाजमान्यता मिळण्याचा संभव नाही. ही सामाजिक विधिनिषेधकल्पना एकाच भाषेपुरती मर्यादित नसून सर्वच भाषांना लागू आहे.

**ए२, शांतिवर्धन, २/१५ कर्वे रोड, एरंडवन, पुणे ४११००४.**

○○○





अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन : वर्ष १२, १९९४ ची सूची

## (१-हिवाळा, २- उन्हाळा, ३- पावसाळा, ४- दिवाळी)

### लेखक सूची

कोल्हटकर माधवी / शब्द, कोश आणि प्रयोग (भाषानिरीक्षण) / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ४४.

खडपेकर विनया / बालभारती- कुमारभारती : एक अवलोकन / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. २०.

गंधे विनायक / 'एकच प्याल्या' ची भाषा / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. २२.

गुंडी नीलिमा / बोलू, तैसे लिहू (भाषाशिक्षण) / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ५३.

घाटे वि. द. / जिवंत मराठी (पुनर्भेट) / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. १६.

जोगळेकर गं. ना. / ज्ञानक्षेत्रातील अराजक (संपादकीय) / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. १

तुळपुळे शं. गो. / जेजुरीचा जर्मन वारकरी : डॉ. गुन्थर सोन्थायमर / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ४.

तेलंग विजया / 'बडुवा' आणि 'गाऊ' : अर्थवेध (शब्दकथा) / १२ : २ उन्हाळा १९९४ / पृ. ४६.

दामले प्रवीण / 'ण' च्या निमित्ताने (ज्याची त्याची प्रचीती) / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ४४.

दीक्षित श्रीनिवास / नाही, हो, माय मराठीचा अडसर नाही / (साद आणि प्रतिसाद) / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ५०.

देव विजया / एटिकेट (शब्दकथा) / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ५१.

देव विजया / वक्ता दशसहस्रेषु (ग्रंथपरीक्षण)-(परीक्षित ग्रंथ The business Guide to Effective speaking / Jacqueline Dunckell & Elizabeth Parnham / Kogan Page Ltd., 1985) / १२ : १ हिवाळा १९९४ / पृ. ६३.

देव विजया / संस्कृतीचे जतन (संपादकीय) / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ.१.

देशपांडे माधव / संस्कृत आणि प्राकृत : भाषिक व सामाजिक संबंध / १२ : ४ दिवाळी १९९४ / पृ. ९.

देशपांडे स. ह., गोडबोले मंगला / 'भाषण' आणि 'व्याख्यान' / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ४६.

देशपांडे गौरी / दोन लेखांवरील प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद) / १२ : २ उन्हाळा १९९४ पृ. ५४.

निमकर सुहास / भारताबद्दल दुरभिमान नको / १२ : ३ पावसाळा १९९४ / पृ. ५५.

पाध्ये कमल / जीवन, भाषा, कला : एक गोची (दखलपात्र) / १२ः १ हिवाळा १९९४ / पृ. ३७.

बेलवलकर सुमन / परभाषकांसाठी तयार केलेली मराठीची पाठ्यपुस्तके : इयत्ता ६,७,८ / १२ः ३ पावसाळा १९९४ / पृ. ३६.

भागवत वा. बा. / भाषेसंबंधी वेदातील काही विचार / १२ः ४ दिवाळी १९९४ / पृ. ४.

भागवत श्री. पु. / वस्तुस्थितीचा स्वीकार (साद आणि प्रतिसाद) १२ः ३ पावसाळा १९९४ / पृ. ५४.

भागवत श्री. पु. / संकटग्रस्त मराठी (पुनर्भेट / १२ः २ उन्हाळा १९९४ पृ. ३१.

भोसले द. ता. / उच्च माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तके / १२ः ४ दिवाळी १९९४ / पृ. ४४.

मराठे मन्दाकिनी / जेरी, पेरी (शब्दकथा) / १२ः १ हिवाळा १९९४ / पृ.४७.

मुंडले आशा / वापरातून जात चाललेले शब्दप्रयोग (संपादकीय) / १२ः २ उन्हाळा १९९४ / पृ. १.

मोहिते शरदिनी / एक नावाचा शोध (जाता जाता) / १२ः २ उन्हाळा १९९४ / पृ. ५०.

रथ विमल / मिस्टर (शब्दायन) / १२ः ३ पावसाळा १९९४ / पृ. ४८.

राईलकर मनोहर / मराठीतील लांबलचक वाक्ये (साद आणि प्रतिसाद) /१२ः ४ दिवाळी १९९४ / पृ. ५५.

राईलकर मनोहर / संख्यावाचनः एक नवीन दृष्टिकोन / १२ः २ उन्हाळा १९९४ / पृ. ३.

राईलकर मनोहर / परिभाषा / १२ः ३ पावसाळा १९९४ / पृ. २२.

साधू अरुण / 'सूटेबल बॉय' मराठीत आणताना / १२ः ४ दिवाळी १९९४ / पृ. ३३.

सामंत सत्त्वशीला / देवनागरीतील जोडाक्षरांची मोडतोड (ज्याची त्याची प्रचीती) / १२ः १ हिवाळा १९९४ / पृ. ४१.

**लेखन - सूची**

१९९३ मधील भाषाविषयक लेखनाची सूची / १२ः १ हिवाळा १९९४ / पृ. ६६.

उच्च माध्यमिक स्तरावरील पाठ्यपुस्तके / द. ता. भोसले / १२ः ४ दिवाळी १९९४ / पृ. ४४.

○○○





अनुक्रमणिका

सूचना फलक

# पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यांसबंधी (वृत्तपत्रे आणि पुस्तके नोंदणी अधिनियम, कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली, १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते, ते निवेदन)

| | |
|---|---|
| १. प्रकाशन-स्थळ | पुणे, महाराष्ट्र |
| २. प्रकाशनाची कालनियतता | त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये |
| ३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता | मृणालिनी शहा, भारतीय, १, शीतल अपार्टमेंटस्, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४ |
| ४. मुद्रणस्थळ | संगम प्रेस, कर्वे रोड, पुणे ४११ ०२९. |
| ५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता | : मृणालिनी शहा, भारतीय, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे |
| ६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता: | कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७. |

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते: मराठी अभ्यास परिषद, द्वारा : अशोक रा. केळकर, ७, धनंजय सोसायटी, ७५९/८३, शिवाजीनगर, पुणे ४११ ००४.

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते, की वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**मृणालिनी शहा**
**प्रकाशक**
**पुणे, २० मार्च, १९९५**

भाषा आणि जीवन ३:२ उन्हाळा १९८५ च्या पृ. ४० वर मागे एकदा **भाषा आणि जीवन** मध्ये लेख पाठवू इच्छिणाऱ्यां लेखकांसाठी काही विषय सुचविले होते. त्यावेळच संपादकीय निवेदन जसेच्या तसे पुनर्मुद्रित करत आहोत. त्यानंतरच्या अंकात त्यापैकी कोणते विषय येऊन गेले. कोणत राहून गेले हे कळण्यासाठी, लेखकांना विषय पाहून लिहिण्यासाठी स्फूर्ती यावी यासाठी, आणि **भाषा आणि जीवन**मधील लेखनाची व्याप्ती कळावी यासाठी त्याचा उपयोग होऊ शकेल.

# लेखकाच्या शोधात साठ विषय

लुइजि पिरांदेल्लो (१८६७-१९३६) या नोबेल पारितोषिक विजेत्या लेखकाच्या 'नाटककाराच्या शोधात सहा पात्रे' (१९२१) या सुंदर नाटकाचा मराठी अनुवाद आपण कदाचित वाचला किंवा पाहिला असेल, तर याठिकाणी लेखकाच्या शोधात निघाले आहेत साठ विषय. बघू या त्यांना कितपत यश मिळते ते!

आंतरभाषिक विवाहातले अनुभव
चित्रकला/मूर्तिशिल्प/वास्तुशिल्प यांच्याबद्दल मराठीत लिहिताना येणाऱ्या परिभाषेच्या अडचणी
मुद्रण संपादन (कॉपीएडिटिंग : मुद्रणप्रत तयार करताना)
भाषा आणि विचारप्रक्रिया
शैक्षणिक माध्यमाचा प्रश्न
मराठीच्या अध्यापनाचा कस कसा वाढविता येईल?
नागपूरच्या मराठीवर हिंदीचे संस्कार
पुरुषांची भाषा
मराठी सुधारायला संस्कृतचे ज्ञान कितपत पाहिजे?
भाषिक नियोजन
प्रयोगजीवी कलांबद्दल मराठीत लिहिताना

परप्रांतातील/परदेशातील मराठी भाषकांचे प्रश्न
मनोरूग्णांशी मराठीतून संवाद साधताना
हस्ताक्षर रोजचे आणि सुणासुदीचे
मराठी बोलणे/लिहिणे सरळ आणि तिरकस
जेव्हा कामगार/आदिवासी पीडित स्त्रिया बोलू लागतात तेव्हा
वाचिक अभिनय कसा असतो? कसा असावा?
बोलणे आणि गाणे
दृश्य-श्रव्य साधने आणि लोकशिक्षण
जुन्या मराठीमधले काही अर्थवाही (पुनरुज्जीवन करण्याजोगे) शब्द
बांगला भाषेच्या काही सुंदर जागा
भाषेचा नाद
कोण म्हणतो मराठीत सकस विचार

मांडता येणार नाहीत ?
भाषेचा दलितपणा
सामान्य माणसापर्यंत वैज्ञानिक दृष्टिकोण कसा पोचवता येईल ?
कोल्हापुरी मराठीचा ठसका आणि गोडवा
सामाजिक परिवर्तन आणि भाषिक परिवर्तन
पंडिती वळण आणि शाहिरी वळण
जाहिरातीमधले मराठी
चित्रपटाची/रंगभूमीची भाषा
चित्रपटामधली/रंगभूमीवरची भाषा
नाटकाची रंगावृत्ती तयार करताना
चित्रांची भाषा आणि कवितांची भाषा
व्यावसायिक पदवीधर (कायदा, वैद्यक, वाणिज्य, शेतकी, तंत्रविद्या, अभियांत्रिकी) आणि मराठी
लहान मुले भाषा कशी शिकतात ? (काही अवलोकने)
कायदेशीर दस्तऐवजांची भाषा
मुलाखत - एक देणे
रामदासांची/एकनाथांची भाषा
मराठी भाषकांचे इंग्रजी अधू का आणि कसे ?
महानुभव गद्याची भाषा
माझे मराठी भाषेशी प्रेमप्रकरण (परभाषा बोलणाऱ्याचे)
माझी माय, माझी मावशी (कोकणी भाषकाच्या दृष्टीकोणातून)
न्यायालयीन कामकाज आणि मराठी (का यावी ? कशी असेल ?)
ग. दि. मा. आणि भाषेची गेयता
कथा वाचायची आणि ऐकायची
कादंबरीची भाषा आणि.....
उर्दू भाषेमधला जोश आणि नज़ाकत
जुन्या मराठी गीतांचा गोडवा आणि आर्तता
पूर्व प्राथमिक/प्राथमिक/माध्यमिक अवस्थेमधील मराठीचे अध्यापन
अनुवाद करताना –
इंग्रजीतून मराठीत/मराठीतून इंग्रजीत/ हिंदीतून मराठीत/संस्कृतमधून मराठीत अनुवाद करताना
जाहिरात - बोलपट आणि मराठी भाषा
रवींद्रनाथ ठाकुर/लोकमान्य टिळक/झां झाक रूसो यांचा भाषाविचार
लघुनियतकालिके : एक फलश्रुती
ग्रामीण साहित्याची भाषा
टिळकांचे/आगरकरांचे/फुल्यांचे मराठी
शिरवाडकरांचा मॅक्बेथचा अनुवाद : एक भाषिक परीक्षण
मुस्लिम/ख्रिस्ती महाराष्ट्रीय आणि मराठी भाषा
संस्कृत शब्दांचा जुन्या मराठीमधील अवतार
भाषाशिक्षणाबद्दलच्या प्रयोगांचे अनुभवकथन
विवेचक गद्य
शालेय/महाविद्यालयीन पाठ्यपुस्तके
सबंध नाव सांग, बाळ!
(काय म्हणता ? साठाच्या वर विषय झाले ? होऊ द्या, होऊ द्या. पत्रिका काही डरत नाही. तुम्हाला लेखन जमणार नसेल, पण तुमच्या एखाद्या मैत्रिणीला किंवा मित्राला अमूक विषयावर लिहायला जमेल असे तुम्हाला वाटते का ? जरूर नाव, पत्ता आणि विषय कळवावा : विषय यादीबाहेरचाही चालेल. आम्ही पिच्छा पुरवू.)

### पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता रक्कम आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

### पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

### परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकांसाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

### जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

◆ **आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?**

⁜ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

⁜ सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

⁜ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल, तर चिटणिसांशी संपर्क साधा.

⁜ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

⁜ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.

⁜ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

◆ **आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?**

⁜ लेखन पाठवा.

⁜ परभाषांतून अनुवाद करा.

⁜ ग्रंथपरीक्षणे लिहा.

⁜ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.

⁜ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

⁜ पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

⁜ जाहिरात मिळवून द्या.

⁜ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

**—संपर्क —**

*मराठी अभ्यास परिषद,*
*१, शीतल अपार्टमेंट,*
*४६/४, एरंडवन, पुणे ४११ ००४*
*(**दूरध्वनी** : ३३ ३८ ६९)*